ललित साहित्य प्रकाशन ४९ वें

# कदली

( कथासंग्रह )

इंदिरा संत

१९५५

किमत दोन रुपये

# कथानुक्रम

# अगतिक ....१

विष्णु ऑफिसच्या बाहेर पडला तेव्हां साडेपांच वाजले होते. विष्णूनं सायकलस्टॅंडपाशीं जाऊन सायकल घेतली, आणि ती अंगाशीच टेकवून धरून सिगरेट शिलगावली तोवर आबानंहि त्याला गाठलं. आबाला त्यानं सिगरेट देऊं केली.

'अहं. अंहं' तोंडांतील पान सावरत आबानं खुणवलं आणि दोघंही हळूं हळूं रस्त्याला लागले.

अकरापासून साडेपांचपर्यंत ऑफिसच्या कामांत फेऱ्या घालून घालून विष्णूच्या मनाला भोंवळ आल्यासारखी झाली होती. तो शरीरानं ऑफिसच्या बाहेर पडला होता पण मनानं अजून सुंदच होता. एकदम बाहेरच्य जगाशीं समरस होणं त्याला जड जात होतं आणि म्हणून तो न बोलतांच चालला होता. आबाच्या तोंडांत पान होतं, त्याचा रसास्वाद घेण्यांत तोही तल्लीन होऊन गेला होता. दोघंही न बोलतांच सावकाश चालले होते.

रस्त्यावर बसस्टॉपपाशीं बस थांबलेली दिसतांच विष्णूला एकदम वास्तवाची जाणीव झाल्यासारखी झाली.

'अरे आज तुझी सायकल नाहीं तर बसनं का नाहीं जात?'

आबानं लालभडक मुखरसाची रस्त्याच्या कडेला लांबलचक पिचकारी मारली आणि रुमालानं ओठाच्या कडा पुसल्या.

'छे रे बुवा–कुठं दोन आणे घालतोस बससाठीं!'

पैसा–काटकसर हा अगदीं आबाचा आवडता विषय आणि नेमका विष्णूनं तोच विषय त्याच्या तोंडात भरवला मग काय आबा सारखा बोलत राहिला आणि विष्णु हं हं करत त्याच्याबरोबर चालला होता.

आज वर्षभर आबाची बायको आजारी होती. घर आणि नोकरी या दोहोंचा भार वागवतांना तो अगदीं टेकीला आला होता. स्वयंपाक, जाग्रणं काळजी–माणसानं सहन तरी किती आणि काय काय करायचं–बायकोसाठीं औषधं, टॉनिक, इंजक्शनं–पैसा कसा आणि कुठं पुरवायचा हेंच त्याला समजेनासं झाऊं होतं. त्याला कर्जही झालं होतं. डॉक्टरचं बिल तर त्याच्या डोळ्यांत मावत नव्हतं. गेल्या सबंध वर्षांत स्वतःसाठीं अशी त्यानं पैही खर्च केली नव्हती. शर्ट शिवले नव्हते. धोतर घेतलं नव्हतं–सिगरेट सोडून पान पसंत केलं होतं–

'या सगळ्यांत भरीला भर म्हणून घरांत पोर नाहीं ही देवाची कृपा आहे महाराजा'– विष्णूला त्यानं अगदीं मनापासून सांगितलं.

आबाची ही कथा विष्णूला नेहमींच ऐकावी लागे. विष्णूला वाटे, काबाडकष्ट, काळजी आणखी काटकसर याचं आबाला व्यसनच लागलं आहे हें सर्व सहन करण्यांत आणि तें 'मी सहन करतो' असं दुसऱ्याला सांगण्यांत आबाच्या अहंकारी मनाला आनंदच वाटत असला पाहिजे. आणि जर सुदैवानं आबाची बायको बरी झाली तर त्याला सहा महिने कांहीं चैन पडणार नाहीं. असाही चमत्कारिक विचार विष्णूच्या मनांत येऊन गेला. आबा इतक्या तळमळीनं बोलत होता कीं त्याला थांबवणंही विष्णूच्या जिवावर आलं. शेवटीं कांग्रेसरोड–वरील उसाचं गुऱ्हाळ दृष्टीला पडतांच विष्णूनं सायकल तिकडे वळवली आणि म्हटलं–

'चल, थोडा रस घेऊं'–

रस पिऊन ते गुऱ्हाळाबाहेर पडले. थंडगार रस पोटांत गेल्यानं दोघांनांही हुशारी वाटली. गार वारा सुटल्याची सुखद जाणीव त्यांना त्याच वेळीं झाली; आणि वृत्ति उत्तेजित झाल्यामुळेंच कीं काय आबा एकदम म्हणाला,

' शिची वॉर कां नाहीं सुरू होत ! झालं तर थोडी पैशासाठीं हालचाल तरी करतां येईल ! '

'जाऊं दे रे. आपल्या मिडल क्लासचं नशीबच सध्या कठीण आहे' आणि मग विष्णूनं त्याला थोड्याफार 'इझम'चें तत्त्वज्ञान पाजून त्याची समजूत घातली.

रेल्वेच्या गेटपाशीं त्या दोघांची वाट बदलणार होती.

'बरं आहे' असं म्हणत विष्णूनं सायकल आपल्या रस्त्याला घेतली आणि तो टांग टाकून बसणार इतक्यांत मागून हांक आली–

'विष्णोऽ'–

आबा अगदीं खुषींत असला कीं अशी हाक मारी. ती हांक ऐकतांच विष्णु आश्चर्यानं तसाच परत फिरला.

'आज रात्रीं पिक्चरला जावं म्हणतो. किती दिवसांत गेलो नाहीं– तूं येशील–ये मी हांक मारतो जातांना'–

'थँक्स' म्हणून विष्णु वाटेला लागला. सायकलवर स्वार होण्याच्या विचारांत असतांनाच त्यानं तो विचार बदलला, आणि तो हळूं हळूं चालत निघाला. त्याला नको झालं होतं. घरीं जाण्यापेक्षां असंच रस्त्यावर रेंगाळावं असं त्याला वाटत होतं. मघांपासून त्याच्या फक्त पायांनाच घरीं जाण्याची जाणीव होती. आणि आतां जणूं कांहीं ती त्याच्या मस्तकांत भिनली होती. तो किती जरी रमत गमत चालला तरी शेवटीं घर आलंच. एका दमांत चार पायऱ्यांवरून त्यानं सायकल वर चढवली आणि तो घरांत आला.

' आमचा राजा आतां दुदू प्याला– होऽऽय दुदू प्याला '–

सुमति स्वयंपाक घरांत मुलाला मांडीवर घेऊन बसली होती. जवळच दुधाची बाटली, भांडं, स्टोव्ह– असा पसारा पडला होता. आतां त्या रडव्या मुलाला तरी घेतलं पाहिजे किंवा चहा तरी केला पाहिजे या पेंचांतून कसं सुटावं याचा विचार करीत विष्णूनं कपडे काढले आणि शीळ घालीत तो दाराशींच उभा राहिला.

' घ्या ह्याला– म्हणजे चहा–'

'ठेव त्याला खालीं– सारखं अंगावर राह्यची संवय केली आहेस त्याला '–

'हो! मी संवय केली– राहील वापडा खालीं '– असं रागानंच म्हणत सुमतीनं मुलाला तिथंच पायानं दुपटं पसरून खालीं ठेवलं आणि ती आंत गेली. जमिनीचा स्पर्श होतांच मुलानं टाहो फोडला. मुकाट्यानं विष्णूनं त्याला उचलून घेतलं आणि मोठ्या मोठ्या आवाजांत तो त्याच्याशीं बडबडूं लागला. पण मुलानं जें अंग ताठ करून रडायला सुरवात केली तें कांहीं थांबेना.

'काय शिचा त्रास आहे?' दणदण पावलं वाजवीत विष्णु आंत गेला

'संभाळ याला' त्यानं मुलाला तिच्या खांद्यावर टाकलं आणि स्टोव्ह आपणांपुढें ओढला. कपांत चहा गाळत त्यानं बायकोला विचारलं–

'खायला आहे कां कांहीं ? '–

'कांऽहीं नाहीं– कांहीं करूं देईल तर ना,– विष्णूनं शेगडीवरचं झाकलेलं भांडं उघडून पाहिलं, त्यांत अर्धी पोळी होती–त्यानं ती काढली.

'ती कालची आहे '–

'म्हणजे आज दुपारी '–

'दुपारी नुसती खिचडीच केली होती. विसरलांत वाटतं'–

'नुस्तीच खिचडी केली होती' असं बिनदिक्कत हंसत हंसत सांगणाऱ्या आपल्या बायकोचा त्याला भयंकर राग आला. पण तो त्यानं गिळला. त्या विषयावर बोलायची सोय नव्हती. पोळीचा तुकडा चहांत बुडवून तोंडांत टाकत तोही हंसत म्हणाला–

'लक्षांत राहण्यासारखं जेवण हल्लीं मी विसरूनच गेलो आहे.'

'तुमचे टोमणे समजतात मला– पण मीही सांगते मला नाहीं होत– माझ्याच्यानीं कांहीं होतच नाहीं.' विष्णूनं चहा, खाणं संपवलं! स्टोव्ह कपाटांत ठेवला आणि कपबशा, भांडी मोरीवर धुण्यासाठीं नेलीं.

'ही बाटली पण घ्या धुवायला '–

स्वयंपाकघर नीट आवरून विष्णु बाहेर आला तो सुमतीच्या मांडीवर मुलगा झोपला होता–

'जरा पाळण्यांत अंथरूण करा ना'–

विष्णूनं पाळण्यांत हात घातला तो चार पांच दुपटीं भिजून चिंब झालेली 'काय करावं या सुमतीला'– या विचारानं त्रासून त्यानं भराभर दुपटीं खालीं काढून बाहेर नेऊन वाळत टाकलीं आणि नवे कपडे घालून बाळाचा बिछाना तयार केला–

'मुलाचे कपडे देखील तुला नीट ठेवतां येत नाहींत, मुतेऱ्या कपड्याचे हात धुवून येतांना तो म्हणाला.

'मला कांहीं येत नाहीं– झालं ना समाधान– माहेरीं मला कधीं कोणत्याच कामाला हात नाहीं लावावा लागला– मला नाहीं जमत.'

पुन: माहेरची थोरवी– विष्णु याच विषयावर भयंकर चिडायचा–

'मग माहेरून येतांना गडी आणायचा होतास.'

'माहेरनं गडी आणला तरी त्याला दोन वेळ जेवायला इथंच घालायला पाहिजे ना!' तीही ठसक्यानं म्हणाली.

कांहीं न बोलतांच तो क्लबमधें जाण्यास निघाला.

रात्रीं आठवाजेपर्यंत तो घराला पूर्णपणें विसरला होता. मित्रांच्या बरोबर मनसोक्त गप्पा मारल्या होत्या– खूप हंसला होता– पत्ते पिसले होते– वेळ कसा मजेंत गेला होता.

घरीं आला तेव्हां त्याला मुलाची जाग लागली नाहीं. तो झोपला आहे या कल्पनेनं त्याला हलकं वाटलं होतं. आतां शांतपणें सुमतीबरोबर गप्पा करत जेवायला हरकत नाहीं–या विचारांत तो स्वयंपाक घरांत आला सुमति तिथंच दोन पाट जोडून त्यावर पडली होती. तो आल्यावर ती उठली.

'चल आतां जेवून घेऊं–काय केलं आहेस जेवायला?'--

'पिठलं न् भात'–

त्यानं नाक चढवलं–

'पाहिलं मी–पण मला आज बरंच वाटत नाहीं. आणि त्या कारट्याला घेऊन घेऊन कीं काय, दंड असे वळताहेत'–

पानावर वाढून घेऊन त्या दोघांनी पहिला घास मात्र घेतला–पाळण्यांतून चळवळ ऐकूं आली.

सुमति वैतागली. ' अगदीं नेहमीं हें अस्सं धड जेवूं देखील देत नाहीं हा. '—

मुलाला मांडीवर घेऊनच तिनं जेवण संपवलं, स्वयंपाकघराची आवरा-आवर विष्णूनंच केली. मग मुलाला औषध—गुटी घालण्याचा कार्यक्रम होता. सुमतीनं मुलाला पायावर घालायचं—विष्णूनं त्याचे हातपाय पकडून ठेवायचे आणि मग बोंडल्यांतून त्या हट्टी मुलाला गुटी पाजायची. हा कार्यक्रम पार पाडत असताना विष्णु वारंवार घड्याळाकडं पहात होता. आतां इतक्यांत आबाची हाक येणार होती. त्यानं अजून सुमतीला आपला सिनेमाचा बेत सांगितला नव्हता. त्याला सांगायला संकोच वाटत होता. सुमतीला घेऊन सिनेमाला जाणं शक्य नव्हतं. त्यानं तो प्रयोग एकदां करून पाहिला होता. आणि त्या वेळीं सुमतीला थिएटरमधे सारख्या आंत बाहेर येरझारा कराव्या लागल्या होत्या. लोकांकडून शिव्या खाव्या लागल्या होता. तेव्हांपासून सुमति सिनेमाला जात नव्हती; म्हणून तोही जात नव्हता. आणि आतां मित्राच्या बोलावण्यावरून जायलाही त्याला संकोच वाटत होता.

मुलाला गुटी घालून सुमतीनं त्याला वर उचललं मात्र—त्यानं ती भडभड ओकून टाकली.

'चुकलंच माझं—भरल्या पोटावर त्याला औषध घालायला नको होतं '— असं ओशाळून सुमति आपल्याशींच पुटपुटली. मुलाचे कपडे, तिचं पातळ सर्व खराब होऊन गेलं.

'ह्याला जरा धरा ना,—सुमतीनं असहायपणें विष्णूला हाक मारली. दोघांनीं मिळून कसेबसे त्याच्या अंगांतील कपडे बदलले. त्याच्या रडण्याच्या आवाजानं विष्णूचं मस्तक चढल्यासारखं झालं. त्याला खांद्यावर टाकून विष्णू बाहेर अंगणांत आला. कधीं या त्रासातून सुटेन असं त्याला होऊन गेलं. सुमतीविषयीं त्याच्या मनांत बसलेले तिढे भरभर सुटले आणि तिच्याविषयींच्या अतीव करुणेनं त्याचं मन भरून गेलं 'गरीब बिचारी,— मनाशींच पुटपुटत त्यानं रडणाऱ्या मुलाला एक चापटी लगावली.

'विष्णो ऽ ऽ 'मुलाच्या रडण्यामधूनच आबानं हाक मारलेली त्याला ऐकूं आली.

'आलो रेऽ' म्हणत तो घाईघाईनं घरांत शिरला.

'घे याला, आबा सिनेमाला जायला बोलावतो आहे—जाऊ का—तूं म्हणशील तसं'—

'इश्श ! जा की'—सुमति मुलाला घेत म्हणाली.

आबाबरोबर आणखी कोणीतरी तरुण मुलगी होती. ती आबाची मेव्हणी होती. आजारी बहिणीला भेटण्यासाठीं म्हणून कालच आली होती आणि आतां दोन तीन महिने तिच्या शुश्रूषेसाठीं इथंच राहणार होती. चांदण्याच्या प्रकाशांत विष्णूनं तिच्याकडे पाहून घेतलं. ती चांगली उंच नि बहिणीसारखीच सुस्वरूप होती. तिचे केस खूप लांब होते. अर्ध्या पाठीपर्यंत ते मोकळे ठेवून मग त्यांच्या तिनं दोन वेण्या गुंफल्या होत्या त्या मांडीपर्यंत पोचल्या होत्या. तिचा आवाजही गोड होत्या.

विष्णु सिनेमांत चांगलाच रमला. चित्र चांगलं आहे कीं नाहीं हा विचार करण्याचं कारणच नव्हतं. अगदीं थोडक्या पैशांत ऑफिस आणि घर यांना विसरायला लावणारी ती एक किमया होती. तींत सुखही उत्कट होतं आणि दुःखही उत्कट चितारलं होतं. क्षणोक्षणीं कणाकणानं पिचणाऱ्या जीवाला ही उत्कटता यावीशी वाटत होती. उन्मत्त वक्षस्थळ असलेली ती नटी—ते दिवाणखाने नि त्या बागा—ते प्रणय—ती वासनांनीं थवथबलेलीं गाणीं—ते अपघात—ती दारुण अवस्था—यांनीं त्याचं मन भारल्यासारखं झालं होतं. चित्रपट असावा तर असा असं म्हणतच तो पुनः घरीं आला होता.

खिडकींतून त्याला उजेड दिसला. सुमति जागी होती तर. दाराशीं येतांच पाळण्याच्या दोऱ्यांचा कर कर आवाज ऐकूं आला. एक सुस्कारा टाकून त्यानं दारावर टकटक केलं.

सुमतीनं दार उघडलं. तिचे डोळे झोपेनें तारवटल्यासारखे झाले होते तिचा हातही त्याला कढत लागला.

'तूं नीज मी झोपवतों त्याला.' असं म्हणून विष्णूनं पाळण्याच्या दोऱ्या हातांत घेतल्या पाळण्यापाशींच घातलेल्या अंथरुणावर सुमतीनं 'आई आई ग' म्हणून अंग टाकलं.

'सुमती '– मूल झोपतांच विष्णूनं सुमतीला हाक मारली. 'तुझे दंड दुखताहेत ना–चेपून देतो ' असं म्हणत तो तिच्या गादीशीं बसला.

'सुमती '–

'मी इतकी दमले आहे–' तिनं त्याचा हात बाजूला केला.

'असं काय–तुझे दंड दाबून देतो'–

'खरंच ' मला कसली इच्छाच उरली नाहीं. पडूं दे मला '–सुमतीनं त्याचा दंडावरील हात काढून टाकला.

रागानं आणि वैतागानं त्याला घुसमटल्यासारखं झालं. तो तसाच उठून आपल्या कॉटवर येऊन पडला.

थोड्या वेळानं सुमतीनं त्याला हाक मारली.

'जरा थर्मामिटर द्याना–आतांशा रोज रात्रीं अंग तापतं आहे कीं काय कुणास ठाऊक '–

विष्णूला उठून तिचा ताप पहावसं वाटलं पण तो उठलाच नाहीं तीच मग धडपडत उठली. तिनं ताप पाहिला आणि विष्णूला म्हणाली--

' रागावलात ना–माझंच माझंच ' मुळीं नशीब खोटं आहे'–तोंडावर पांघरूण ओढून ती झोपली. ती रडत असावी असा विष्णूला भास झाला. तो ताडकन उठून बसला.

'बंद कर पाहूं--हें काय चालवलं आहेस'--आणि पुनः दणकन् त्यानं कॉटवर अंग टाकलं.

' पुनः आणि असं म्हणायचं '–इतकंच बोलून ती गप्प झाली.

विष्णूनं भराभर घराचे, मुलाचे, बायकोचे विचार मनांतून काढून टाकले आणि तो मनोराज्यांत शिरला. अंगावरचीं वस्त्रं काढून माणूस पोहायला पडतोना अगदीं तसंच. त्याच्या डोळ्यांसमोर ती सिनेमांतील नटी दिसूं लागली; आणि तो तिच्यावर प्रेम करूं लागला. तिच्या गळ्यापासच्या खळगीवर जो काळाभोर तीळ होता त्याच्यावरून त्यानं हलकेच बोट फिरवलं. इतक्यांत आबाच्या मेव्हणीची त्याला आठवण झाली. ती दोन महिने राहणार होती. मग तिनं विष्णूवर प्रेम करायला नक्की सुरवात

केली असती. ज्या दिवशीं विष्णू तिला एकेरी नांवानं हाक मारणार होता त्याच दिवशीं तिला तो सांगणार होता, 'चंपे' ही अभिसारिकेसारखी तुझी केशभूषा मात्र मला मुळींच आवडत नाहीं, तिला असं सांगायचं त्यानं निश्चित ठरवून टाकलं.

झोप येईपर्यंत किंवा पुन: पाळण्यांतील मूल उठेपर्यंत तो तसाच रमणार होता. आणि मूल उठलं असतं तरी त्यानं त्याची दखल घेतली नसती. सुमतीनंच उठून त्याला घेतलं असतं. थोडा वेळ थोपटलं असतं, डोलवलं असतं—आणि मग चिडून संतापून त्याला कुशीत घेऊन ती झोपली असती. रात्रभर त्या मुलानं तिचीं आंतडीं तोडलीं असतीं. या सगळ्याकडे दुर्लक्ष करून विष्णूनं आपल्या मनोरथांचीं शिळीं भजीं पुन: पुन: तळणांस घातलीं असतीं. अगदीं उद्यांपर्यंत—, पण त्या उद्यांविषयीं तो मुळींच उत्सुक नव्हता. कारण तो उद्यांही आजसारखाच असाच शिणलेला आंबलेला असाच फरपटत ओढत जायचा होता!



# ती अबोलीची वेणी आणि— ...२

महाराष्ट्रभुवन मधल्या आपल्या खोलींतील कॉटवर अनंता अगदीं मनापासून विश्रांति घेण्यासाठीं लोळत पडला होता. गुडघ्यावर लोकसत्तेचं कोडयाचं पान विसावलं होतं, आणि डाव्या हाताखालीं एक पिवळ्या तांबडया चकचकीत कव्हराची रहस्यकथा पानं पसरून दडली होती. कॉट-खालीं म्हणून फेकलेलं सिगारेटचं थोटूक चादरीलाच अडकून राहिलं होतं, आणि अनंता सावरीच्या उशींत शक्य तितकं मस्तक रुतवून विश्रांति घेत होता.

'दोन वाजले साहेब—' एका कळकट पोऱ्यानं दार धाडकन उघडलं आणि त्याच्या विश्रांतीचा भंग केला.

आणि मग अनंतानं चटकन् विश्रांति आवरली— चूळ भरली आणि टेब-लावर जेवणापूर्वीं लिहून ठेवलेला कपटा उचलून त्यावरून पुन्हां एकदा नजर टाकली.

दुपारचा कार्यक्रमः—

(१) २ ते २॥ सामान आवरणें.
(२) ३—ठळकवाडींतील डॉक्टरशीं मुलाखत.
(३) ३॥ शहापूर—डॉक्टरची भेट.
(४) ४ ते ५ विनायककडे चहाफराळ आणि वधूपरीक्षा.

(५) ५॥-जनतेनें मुंबईस प्रयाण.

सर्व कार्यक्रम त्यानं नीट पुन्हां एकदां वाचला. वधूपरीक्षा शब्दावर त्याचे डोळे रेंगाळत राहिले.

डाव्या हातानं सिगारेटचे झुरके घेत उजव्या हातानंच येईल तशी त्यानं बॅग भरली. बाहेर जातेवेळचा सूट खुर्चीवर काढून ठेवला. होल्डॉल बांधून, व्यवस्थितपणें बॅगवर ठेवला. आणि इतकं सर्व करून झाल्यावर त्यानं चहा मागवला. चहा येईपर्यंत कोटाच्या वरच्याच खिशांत असलेली चिठ्ठी त्यानं बाहेर काढली आणि पुन्हा एकदां वाचली. त्याचा मित्र विनायक यानं सकाळींच नोकराकरवीं त्याला ती धाडली होती. त्यानं लिहिलं होतं-

प्रिय अनंत,

आज चारच्या सुमारास सगळीं कामं संपवून तूं आमच्याकडे ये. चहा, तुला आवडणारे डिंकाचे लाडू आणि दहिपोहे- सौ. कमल आतांपासून त्या तयारीला लागली आहे. शिवाय सोबत एक वधु-परीक्षेचा समारंभ. आजवर तूं फार मुली नापास केल्यास. पण आतां तूं हरणार असा माझ्या बायकोचा दावा आहे. मुलगी तिच्याच पसंतीची आहे. तुझा-

विनायकराव.

चिठ्ठी वाचून त्यानं घडी करून खिशांत ठेवली; नेहमींपेक्षां जरा काळजीपूर्वक केस बसवले; टॉयची गाठ नाजूक हातानं ठीक केली आणि तो बस गाठण्यासाठीं घाईघाईंत बाहेर पडला. अंबाभुवनच्या स्टॉपपाशीं बस उभीच होती. धांवतच त्यानं बस गाठली आणि चालू झालेल्या बसमधें तो चढला. बस खच्चून भरली होती. मिळालेल्या एवढयाशा जागेवर तो कसाबसा बसला, आणि मग त्यानं इकडे तिकडे पाहिलं. पुढच्याच बाकावर दोन खेडूत बसले होते आणि "गवताचा चढलेला भाव" या विषयावर त्यांची गंभीर चर्चा चालली होती. मागच्या बाजूनं कुणी कर्कश आवाजांत कुणाला सांगत होतं. "भाची बाळंत झालीय-आठ दिवस झाले-आज निघाले बघा तिच्याकडे- "

मागून चढया सुरांत कुणी तक्रार करत होतं-

अय्यो शिवनऽ! जरा सरकून घ्या कीं बाई–ते मुलाला मांडीवर धरा कींऽ. . .'

आणि मग अनंतरावाचं आपल्या उजव्या हाताकडील बाकाकडे लक्ष गेलं. एक मुलगी त्याच्यासारखीच कशीबशी सीटच्या टोकाला बसली होती तोल सांभाळण्यासाठीं तिनं पुढच्या बाकाच्या पाठीला हात धरला होता. तो त्याला गोरापान दिसला. त्या मुलीचा चेहरा त्याला दिसत नव्हता, ती खिडकींतून बाहेर पहात होती, पण उघडच्या गोऱ्या मानेवरील मोठासा तीळ आणि त्याला बिलगून असलेली सोन्याची साखळी त्याच्या नजरेंत भरली. पण त्याचे डोळे स्थिर झाले ते वेगळयाच ठिकाणीं. आपल्या कुरळया केसाचं तिनं भलं मोठं चक्कर घातलं होतं आणि वर अबोलीची वेणी माळली होती. तें केसांचं आणि रंगाचं वैभव कुणाचंही मन वेधून घेण्यासारखं होतं. तिथंच त्याचे डोळे स्थिर झाले. ती अबोलीची वेणी न्याहाळतांना त्याचे डोळे एकदम चमकले. त्या वेणीच्या वलयांतूनच हळूहळू एक ऊ बाहेर पडली–आणि त्या केसांच्या वलयांतून मोठ्या नाजूकपणानं आपला मार्ग शोधू लागली. तिचा तो प्रवास अनंताला मोठा गमतीदार वाटला. एरवी ऊ म्हटली कीं अनंताच्या अंगावर शहारे आले असते, पण आतां त्या ऊ पेक्षा तिचं ते आपल्या रेशमी पायानं त्या वलयांतून नाजूकपणें हिंडणं त्याला कौतुक करण्यासारखं वाटलं. एकादा शास्त्रज्ञ आपला प्रयोग जितक्या आत्मीयतेनें न्याहाळील, जितक्या आत्मीयतेनें अनंतरावाचं निरीक्षण सुरू झालं. तो कांहीं असा फारवेळ पहात नव्हता पण एकदम त्याच्या कानांवर फिसफिश्या आवाजांतले शब्द आले–

"ए बेबी, तो माणूस सारखा बघतो आहे तुझ्याकडे. 'निर्लज्ज मेला–"

त्या बेबीच्या शेजारणीनं बेबीच्या कानांत हें सांगितलं असावं.

अनंता एकदम चमकला, भानावर आला. चटकन पुढें पाहूं लागला–एक काळयाभोर डोळयांचा जळजळीत कटाक्ष आपल्या कानशिलाला डागणी देऊन गेल्याचं त्याला जाणवलं. त्यानं खिशांतून रुमाल काढून चटकन् नाक पुसल्यासारखं केलं आणि पुढे ज्या स्टॉपवर बस उभी राहिली त्याच स्टॉप-वर तो घाईघाईनें उतरला. बसची पायरी उतरतांना त्या दोन पोरींचं खेकाळणं त्याला स्पष्टपणें ऐकू आलं आणि तो अधिकच ओशाळला.

या बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत त्याच्यावर असा ओशाळगतीचा प्रसंग आला नव्हता. त्यानं चालता चालता तो प्रसंग मनांतून झटकून टाकण्याचा खूप प्रयत्न केला पण तसं तसं त्याला अधिकच शरमिंदं वाटू लागलं. आणि अबोलीच्या वेणीजवळील ऊ चा तो पदविन्यास कांहीं केल्या त्याच्या मनापुढून जाईना. त्यानं कडकडून ओठ चावला. त्याला राग आला. तो काय त्या पोरीच्या तोंडाकडे पहात होता?— छे. तिच्याहून सुंदर सतराशे-साठ पोरी त्यानं पाहिल्या होत्या. आणि आतां त्या आगावू मुलीनं बालंट त्याच्यावर आणलं होतं आणि पुन्हा त्या दोघीही फिदीफिदी हंसल्या होत्या— शी—त्यानं पुन्हां एकदां रुमालानं आपलं थरथरीत नाक खसाखसा पुसलं आणि आपल्या औद्योगिक मुलाखतीसाठीं मन स्वच्छ केलं.

दोन्ही मुलाखती आटपून तो जो गोवा वेशीतील स्टँडपाशीं आला, तेव्हां साडेतीन वाजून गेले होते. अजून बसला पत्ता नव्हता. सारखा घड्याळाकडे आणि बसच्या दिशेकडे तो अधिऱ्या मनानं पहात होता. शेवटीं बस आली ती अगदीं चिक्कार भरून. सर्वांना बाजूला सारत तो धसमुसळेपणानं वर चढला आणि जिथं उभं रहायला जागा मिळेल तिथं दांडीला धरून उभा राहिला. त्याच्या मागून आणखी माणसं चढलीं आणि उन्हानं तापलेल्या त्या बसमध्यें त्या गर्दीनं तो अगदींच घुसमटून गेला. बस पुलावर चढू लागली तसा ताजा वारा आंत आला आणि त्याला हलकं वाटलं. पोस्ट ऑफिसपाशीं बस थांबली आणि एका रस्त्यावरील गृहस्थानं त्या गर्दीतही त्याला ओळखलं. तो बसपाशीं धावला—

'यावाग वंदिरी रायरऽ? थोडं महत्त्वाचो काम होतं तुमच्या कडं—'

त्या गृहस्थापाशीं अनंताचंही मोठं महत्त्वाचं काम असावं— शक्य तितकं खिडकीशीं जाऊन अनंता मोठ्यानं म्हणाला,

'संध्याकाळीं साडेपांचला स्टेशनवर भेटा—जरूर भेटा वरं काय—'

स्टेशनवर भेटण्याचं महत्त्व त्या गृहस्थाला पटवून देण्यासाठींच कीं काय अनंतानं स्टेशनच्या दिशेनं दोन तीनदां हात दाखवला. आणि तो हात पुन्हा आवरून जवळ घेतांना तो एकदम दचकला—कसला तरी नाजूक रेशमी स्पर्श त्याच्या हातावर हुळहुळला. आपल्या हाताला कसला स्पर्श झाला याची त्याला जाणीव होण्यापूर्वींच त्याच्या कानांवर शब्द आले.

'जरा आवरून उभे रहा की– दिसत नाहीं?'

त्या आक्रसलेल्या भुंवया, तें रुष्ट काळे भोर डोळे–ते थरथरणारे ओठ आणि ते मानेच्या हिसक्यासरशीं झोके घेणारे मोत्याचे झुबे–

तें त्यानं पाहिलं आणि एक आवंढा गिळला. 'सॉरी' म्हणण्याचा त्याचा प्रयत्नहि फुकट गेला. त्याचा चेहरा एकदम उतरला. शंकाच नको. ती मघाचीच मुलगी होती ती. पण आतां अगदीं दिमाखांत, थाटांत. शहापुरी रेशमी अंजिरी साडी झगमगत होती. चेहऱ्यावरील प्रसाधन फुलासारखं ताजं होतं. मघाचं ते चक्कर आणि ती अबोलीची वेणी तशीच होती, पण त्या अबोलीमागें आतां सोनचाफ्याची एक नाजूक वेणी प्रभावळी सारखी उभी होती–आणि ऊ होती कीं नाहीं ?

पण याबद्दल विचार करण्याचं त्याला सामर्थ्य उरलं होतं काय ? बस-मधले शक्य तितके चेहरे त्याच्याकडे पहात होते. कांहीं कुतूहलानं–कांहीं–ओठ दाबून हंसत–अगदीं पुढून बसचा ड्रायव्हर कपाळावरील मलीन झुलपं मागं सारीत मान मागें वळवून मोठ्यानं सांगत होता.

"गर्दीत जरा संभाळून उभे रहा की अण्णा–"

तिकिटाची लोखंडी पत्र्याची पिशवी एका हातानं सावरीत त्या गर्दींतूनच वाट काढीत बसचा कंडक्टर त्याच्यापाशीं आला आणि–

"साहेब तुमी इथं बसून सोडा"–असं म्हणून अनंताला त्यानं अगदीं मागच्या सीटवर थोडी जागा करून दिली.

आजच्या दिवसाला कांहीं विवक्षित बाधा झाली आहे-असं अनंताला वाटलं सकाळींच त्यानं मौजेमधील पटणारं भविष्य पाहिलं होतं–" प्रेमसंबंधांत यशस्वी व्हाल " असं त्यांत चक्क लिहिलं होतं–आणि प्रेम तर बाजूलाच पण कुठली कोण ही पोरगी दुपारपासून त्याचा असा पाणउतारा करत होती त्याचं डोकं सुंद झालं.

विनायकाशीं गप्पा, वहिनींची थट्टा-मस्करी डिंकाचे लाडू –दही पोहे आणि वहिनींच्या पसंतीची मुलगी पहाणं किती गोड गोड स्वप्नं त्यानं मनाशीं बाळगलीं होतीं आणि यांतलं एकही स्वप्न नाहींसं होऊ नये म्हणून

अधिऱ्या मनानं तो बसमध्यें चढला होता. आतां त्या साऱ्या स्वप्नांवरून पोतेऱ्याचा बोळा फिरला.

बस अखेरच्या स्टॉपशीं येतांच तो खालच्या मानेनेंच खालीं उतरला. शेजारच्या पानपट्टीच्या दुकानांत जाऊन त्यानं एक सिगारेटचं पाकीट खरेदी केलं. एक सिगारेट शिलगावली आणि खालीं मान घालूनच तो चालू लागला. झालेली गोष्ट त्याच्या मनाला फार लागली. त्याला त्या मुलीचा फार राग आला. चुकून हात लागल्यासारखा झाला तर काय डाफरली! व्यवसायाच्या निमित्तानं आजवर किती मुलींना तो ओळखत होता. पण असा कधीं त्याला अनुभव आला नव्हता. त्याला ती कल्पनाच असह्य झाली. सिगारेटचा धूर जोरजोरांत सोडत तो चालला होता.

ती अंजीरी साडी नेसलेली मुलगी त्याच्या पुढेंच आठ दहा पावलं चालत होती. तो तिच्यामागून चालत होता पण त्याचं लक्ष नव्हतं.

बारागडगड्याच्या विहिरीपर्यंत गेल्यावर तिनं मागं वळून पाहिलं. तो तिच्यामागून येत होता. अगदीं जसं कांहीं आपण त्या गांवचें नाहीं असं भासवत होता. सभ्य पोषाख केलेली सभ्य दिसणारीं माणसं देखील किती ही असतात! तिनं तिटकाऱ्यानं मानेला एक हिसका दिला आणि ती पुढं चालली. महादेवगल्लीच्या नाक्याशीं तिनं पुन्हा मागें वळून पाहिलं– चार माणसांच्या आड त्याचा चौकटीचा कोट तिला ओझरता दिसला. स्वारी अजून मागे आहे तर! ती किंचित् घाबरल्यासारखी झाली. तिनं चिमुकल्या रुमालानं कपाळ टिपलं आणि ती पावलं जलद टाकूं लागली. मारुतीच्या देवळापाशीं जाऊन तिनं पुन्हां मागें वळून पाहिलं. तो तिच्यापासून चार पावलावर होता.

तिनं हातरुमाल मुठींत गच्च दाबला आणि ती थांबली–

'काय हो? हें काय चालविलं आहे तुम्ही? शोभतं तुम्हाला?'

तिच्या शब्दांनीं त्याला आडवलं. त्याला उमजेना– आपल्या हातून काय घडत आहे.

'तुम्हाला काय म्हणायचं आहे कळत नाहीं– मी इथं माझ्या मार्गानं निघालों आहे–'

'कशाला कळेल– म्हण माझा मार्ग ! पोलीसला सांगतें मग तो दाखविल तुमचा मार्ग– असं मुलींच्या मागून पाळत ठेवून हिंडायला लाज नाहीं वाटत ? '

ती इतकं बोलून तरातरा पुढें निघून गेली. हतबुद्ध होऊन त्यानं इकडं तिकडं पाहिलं. सुदैवानं कुणाच्या कांहीं लक्षांत आलं नव्हतं. ती व्याद त्या रस्त्यानें एकदां नाहीशीं झाली कीं आपण निघावं असा विचार करून तो तिथल्याच एका दुकानांत शिरला. ज्या घरांत त्याला जायचं होतं तें घर कांहीं तेथून फारसं लांब नव्हतं– त्यानं कांहीं खरेदी करावयाची राहिली होती ती सावकाशपणें करायला सुरवात केली. दाढीची पातीं– टूथब्रश, दोन हातरुमाल– अॅनासिनची पांचसहा पाकीटं अशी त्यानं खरेदी केली आणि पुडा हातांत घेऊन तो दुकानाच्या पायऱ्या उतरला. दूरवर त्यानं निरखून पाहिलं. अंजिरी साडी कुठं झगमगत नव्हती. सुटल्याचा श्वास टकून तो गल्लीकडे वळला.

काय पण विचित्र अनुभव. आणि ती पोरगी येवढी तणातणा बोलली पण आपल्या तोंडून एक शब्दही कसा फुटला नाहीं याचं त्याला राहून राहून आश्चर्य वाटत होतं. इतकं आपण गडबडून जावं. आपण–

तो काय रस्त्यावरून हिंडणारा कॉलेज तरुण थोडाच होता, कीं त्यानं मुलींच्या मागून हिंडावं. एका मेडिकल फर्ममधें साडेतीनशे रुपये पगार मिळवणारा तो एक कर्तबगार गृहस्थ होता. आणि त्याला या अनुभवांतून जावं लागावं– आणि तें सुद्धां या बेळगांवसारख्या शांत मागवटलेल्या शहरांत–त्याचं त्यालाच हसूं आलं– ही बेळगांवची माती भारीच तिखट! आपल्या कल्पनेवर खूष होऊन त्यानं समोर पाहिलं आणि त्याचीं पावलं तिथंच थांबली.

ज्या घरांत तो शिरणार होता त्याच घराच्या गॅलरींत त्याला ती अंजिरी साडी झळकल्याचा भास झाला.

डिंकाचे लाडू दहीपोहे– वधूपरीक्षा गेलं सारं खड्ड्यांत–अशा भावनेनं तो परत फिरला– पांच मिनिटांत त्यानं कॅफे गाठलं आणि कोपऱ्यांतील टेबलाशीं हुश्श करून तो बसला.

आदबीनं पुढें येऊन उभे राहिलेल्या वाढप्याला त्यानं सांगितलं—

'स्वामी, वंदु डोशा मत्तु यरडु कॉफी.'

आलेले खाद्यपदार्थ त्यानं भराभर संपवले— कडूगोड कॉफीचे सावकाश घुटके घेतले आणि सव्वापांच वाजेपर्यंत तो खुर्चीच्या मागें मान टेकून एकामागून एक सिगरेट संपवत राहिला. शेवटीं रिकामं पाकीट त्यानं खालीं फेकलं आणि तिथून तो उठला.

मसाल्याची पट्टी चघळत त्यानं उन्हासाठीं डोळ्यावर उजवा हात धरून बस स्टँडकडं पाहिलं— पुन्हा एकदां पाहिलं— त्याला भास झाला कीं खरीच तिथं क्यूंत अंजिरी साडी उभी होती. कुणाला ठाऊक— त्यानं रुमालानं नाकावरील घाम पुसल्यासारखा केला आणि केळकरबागेच्या बोळाची वाट धरली. मिळेल तो टांगा करून तो महाराष्ट्रभुवनमधें परत आला, तेव्हां त्याला बरं वाटलं. कॉटवर उताणं पडून त्यानं सिगारेटचा जोरानं झुरका घेतला, आणि धुराचा लोट सोडला! त्याच्या चेहऱ्याभोवतीं धुराचीं वलयं जमा झाळीं— आणि हलक्या झालेल्या मनावर एकच चित्र टिकून राहिलं— तें त्याला त्या वलयांत दिसलं— ती रंगदार अबोलीची वेणी आणि त्यांतून नाजूक पावलानं चालणारी ती ऊ.

पुढच्या आठ दहा महिन्यांत तो उत्तरेकडे दक्षिणेकडे हिंडला— किती शहरं त्यानं पालथीं घातली. आणि पुन्हा जेव्हां त्याच्या कार्यक्रमाच्या रेषेंत बेळगांव शहर आलं तेव्हां त्याचं मन अस्वस्थ झालं. कामाच्या धडाक्यांत कुठं लपून बसलेली ती अंजिरी साडीची, कुरळ्या केसाची, गोरी पान मुलगी पुन्हां त्याच्या मनासमोर आळी— अबोली— ती ऊ— ते मोत्याचे झोके घेणारे झुबे— ते थरथणारे ओठ— 'दिसत नाहीं' 'लाज वाटत नाहीं' हे शब्द!

नको तें बेळगांव असं त्याच्या मनाला झालं.

पण मनाला ज्या गोष्टी नको असतात त्या व्यवहारांत कुठं टळतात?

हुबळीच्या मुक्कामांत त्याला बेळगांवहून विनायकाचं पत्र आलं—

— 'गेल्या खेपेला तूं फार वाईट गोष्ट केलीस. माझी बायको तुझ्यावर

फार रागावली आहे– आणि माझ्यावरही– कारण मी तुझा मित्र ना– म्हणून ती पुन्हां तुझ्या लग्नाच्या भानगडींत पडणार नाहीं. तिनं अगदीं कानाला खडा लावून घेतला आहे. पण डरो मत. मी तुझ्या पाठीशीं आहे.

निपाणीला मी तुझ्यासाठीं एक मुलगी पाहून ठेवली आहे. अगदीं झकास आहे. या खेपेला चुकशील तर आयुष्यांतला डाव हुकशील.

परवां दोन वाजतां निपाणीच्या बस स्टॉपवर मी तुझी वाट पाहतो– संध्याकाळीं मुलगी पाहून सकाळीं लगेच परतू आपण.

आतां मात्र चुकवूं नकोस. अशा चांगल्या चांगल्या मुली सोडल्यास तर नक्की एखादी शूर्पणखा गळ्यांत पडेल– म्हणून म्हणतो– मित्रा माझं ऐक.

हुत्तरगीच्या स्टँडवर पेरूचा टवका काढत हळूच अनंतरावानं विचारलं–

'काय रे– त्या मागें दाखवणार होतास त्या मुलीचं झालं का लग्न?'

'छ ती अशीच कुठं नोकरी करते आहे– पण लेका वीज होती वीज. पाहायची तरी होतीस–'

अनंतानं मुकाट्यानं पेरू संपवला.

मुलगी पाहण्यासाठीं अनंता विनायकबरोबर ज्या घरांत गेला तो एक मोठा चौसोपी वाडा होता. मधल्या चौकांत एक वृंदावन उभं होतं आणि व्हरांड्याच्या खांबाला बांधून घातलेलं वासरू गवत चघळत, येणाऱ्या पाहुण्या-कडे टकाटका पहात होतं. उजव्या हाताच्या व्हरांड्यावर पोतीं रचलीं होतीं. डाव्या बाजूला भलं मोठं पट्ट्यापट्ट्याचं जाजम हंतरलं होतं. मधें एक गादी घातली होती आणि भिंतीशीं टेकून गादीचेच लोड बनवून ठेवले होते.

एका वृद्ध गृहस्थानं दोघांचं स्वागत केलं आणि त्या गादीवर नेऊन त्यांना बसवलं, विनायकाच्या आणि त्या गृहस्थाच्या गप्पा गोष्टी चालल्या होत्या. आणि अनंत स्वस्थ बसून होता. वासरू दाव्याशीं हुंदडत होतं तिकडे त्याचं लक्ष लागून राहिलं होतं.

थोड्या वेळानं त्या वृद्ध गृहस्थांनीं जवळच बसलेल्या मुलाला सांगितलं. 'बिठू– सुरंगा घरीं आली काय बघ–तिला बोलावून आण बरं–'

सुरंगा–नांव तरी किती गोड ! अनंतानं मनांतल्या मनांतच तें नांब तीन चारदां उच्चारलं– 'सुरंगा, सुरंगा.'

त्या तंद्रींतच त्याला ऐकूं आलं.

'ही सुरंगी– इथं मास्तरीण आहे बघा– भारी गोड स्वभाव–तुमच्या बेळगांवचीच ती.'

' म्हणजे सुरंगा जोशी काय ? '

'हां बघा– तुम्ही ओळखता वाटतं ?'

'अहो खूप–' असं म्हणत विनायकानं अनंताच्या पाठीवर थाप मारली.

बऱ्याच वेळानं चहाचं ताट घेऊन मुलगी बाहेर आली. तें तिनं त्या मंडळीपुढं ठेवलं आणि ती उभी राहिली.

'ही आमची मुलगी बरं–कृष्णा.' अनंताकडे पहात ते वृद्ध गृहस्थ म्हणाले.

आणि मग सुरंगा– अनंता मनांत गोंधळला. कुठें तरी पहायचं म्हणून दाराशीं पाहिलं– व्हरांड्यांतील खांबाला धरून एक पांढरं पातळ नेसलेली मुलगी उभी होती. अनंता दचकला हीच ती अंजिरी साडी, अबोलीची वेणी–

अनंतानं चटकन् खिशांतून हातरूमाल काढून नाक पुसलं–

' ये ग सुरंगा–' विनायकनं तिला बोलाविलं– पण ती आंत निघून गेली. तिच्या निघून जाण्यांतील फणकारा अनंताशिवाय इतर कोणाच्य लक्षांत आला नाहीं.

अनंताचं मन सुंद झालं– विनायकनंच मुलीला चार प्रश्न विचारले आणि थोड्या वेळानं तो उठला.

'आज रात्रींच तुम्हाला काय तें कळवतों' असं उंबऱ्याशीं आल्यावर विनायकनं त्या गृहस्थास सांगितलं आणि दोघेही वाड्याबाहेर पडले.

' अंतोबा गपसा आहेस– ?'

'उगीच '–

' मुलगी छान आहे नाहीं?'

' ती दुसरी कोण रे ?' अस्पष्ट आवाजांत अनंतानं विचारलं–

'विसरलोंच गड्या– अरे तीच ती मागें तुला दाखवायला आणलेली पण तूं आला नाहींस'–

'हें बघ हें लग्न जमणं शक्य नाहीं'–

'कां रे?'–

'ती पोरगी –'

'तिचा काय संबंध'–

'सांगतों तुला सारं'–

घरीं येतांच अनंतानं सारी हकीगत विनायकला सांगितली.

'अस्सं काय?' विनायक खो खो हंसत सुटला.

'हसतोस काय– इथंही ती माझी बेअब्रू करायला मागं पहाणार नाहीं.'

'लाज वाटत नाहीं– दिसत नाहीं– ही काय पोरींच्या तोंडची भाषा काय रे?' अनंता खवळून म्हणाला.

'सांगतो काय– वीज आहे ती वीज.'

विनायक पुढें कांहीं न बोलतांच कोट चढवून पुन्हां घराबाहेर पडला. अनंता पुन्हां सगळ्या स्मृति चाळवीत–योगायोगाच्या गंमतीचा आस्वाद घेत पडला होता–इतक्यांत विनायक आंत आला–

'कुठें गेला होतास?'

'सुरंगा, येना आंत'–विनायकानं बाहेरच उभ्या राहिलेल्या मुलीला आंत बोलावलं. अनंता एकदम उठून बसला. सगळं वातावरण एकदम तंग झालं.

'सुरंगा, बस ना. हा माझा मित्र अनंता–याच्याविषयीं तूं फार गैरसमज करून घेतला आहेस–म्हणून तुला मुद्दाम बोलावलं.'

'गैर मुळींच नाहीं–चांगला समज करून घेतला आहे.'–

'अग पण ऐकून तर घेशील'–

'बोला'–हनुवटी तळहातावर टेकून ती विनायकाकडे पाहूं लागली.

'मी नाहीं बोलणार– हाच सांगेल तुला सर्व.'–

सुरंगा स्वस्थपणें खालीं पाहूं लागली.

'त्या दिवशीं बसमधें मी तुमच्याकडे मुळींच पहात नव्हतों'– अनंता पुढें घोटाळला. तो कुठें पहात होता हें कसं तो सांगणार?

‘ तुमच्या केसांत चरणाऱ्या ऊ कडे मी पहात होतों—’ असं एकादा तरुण एकाद्या तरुणीला कधीं तरी सांगेल काय ?

‘ रस्त्यानं देखील मी तुमच्या मागून येत नव्हतों—मला ह्यांच्याच घरीं जायचं होतं मुलगी पहायला—म्हणून चाललों होतों—’

‘ आणि मग तो तुझ्या मागून येणार नाहीं तर कसा येणार ’ —विनायक मधेंच बोलला!

‘ म्हणजे त्या दिवशीं हे येणार होते? ’ सुरंगानं गोंधळून जाऊन विनायकला विचारलं.

‘ हो बरं—हेच येणार होते. ’—

‘ बाई ग ऽ ’ सुरंगानं एकदम दोन्ही हातांनीं चेहरा झाकून घेतला.

‘ आतां नाहींना गैरसमज उरला ’ —विनायकनं खालीं वाकून तिच्याकडे पहात विचारलं—

‘चला थट्टा नका करू भलती ’—

तिच्या चेहऱ्यावरील विभ्रम टिपतां टिपतां अनंता भान विसरला.

‘ मी जरा घरांत चहाला सांगून येतो हं—’ म्हणून विनायक कधीं निघून गेला हें त्याच्या लक्षांत आलं नाहीं.

‘ मुलगी पसंत पडली तुम्हांला—’ सुरंगानं विचारलं तेव्हां तो भानावर आला.

‘ हो पडली कीं ’—तिच्या चेहऱ्याचा अजमास घेत तो म्हणाला.

‘ खरंच? ’

‘ खोटं वाटतं? ’

सुरंगा बोलली नाहीं.

चहा होतांच विनायक अंगांत कोट चढवीतच उठला—

‘ चल सुरंगा—संध्याकाळ झाली. तुला घरीं पोचवतो आणि त्या म्हाताऱ्याला निरोप सांगून येतो.’—

‘ कसला निरोप ?’ अनंता तंद्रींतून जागं होऊन म्हणाला—

‘ वा महाराज—मुलीबद्दल—’

‘ काय सांगणार त्यानं? ’

'तूं सांगशील तें–' विनायक मिस्किलपणें दोघांकडे पहात म्हणाला.

अनंतानं चटकन सुरंगाकडे पाहिलं–त्याच त्या थरथरणाऱ्या पापण्या–हलणारे ओठ–काळेभोर डोळे–झोके घेणारे मोत्याचे झुबे–ती अबोलीची वेणी–

दहा महिन्यांपूर्वीं जें जें त्याच्या नजरेनं टिपलं तें तें त्याला आतां अगदीं तसंच दिसत होतं–पण वेगळ्या अर्थानें—

विनायक ट्रे ठेवण्यासाठीं आंत जातांच सुरंगानं हळूंच विचारलं—

'खरंच काय कळवणार आहांत?'

'सुरंगा'—

ती खुदकन् हंसली—

'चलो'– विनायकनं वहाणा घालत पुकार केला.

अनंतानं सुरंगाकडे पाहिलं–सुरंगानं अनंताकडे पाहिलं– आणि दोघांनीं मिळून विनायकाकडे पाहिलं—

'किती दुष्ट आहे हा विनायक'–



# स्नेहबंधन .. ३

समुद्राकडे जाणारा आडवा रस्ता संपवून ती मुख्य रस्त्यावर आली तेव्हां तिला बरं वाटलं. फुटपाथवरच्या त्या गर्दीत ती स्वतःला थोडसं विसरून गेली. कुठंच लक्ष न देतां झपझप पावलं टाकीत ती चालली होती. तिच चेहरा अगदीं रडकुंडीला आल्यासारखा झाला होता. कांहीं तरी सारख गळ्यांत दाटून येत होतं आणि वारंवार आवंढा घोटावासं तिला वाटत होतं. ओठ कोरडे पडत होते, तशी ती वारंवार जीभ त्यावरून फिरवत होती. तिच्या कानशिलापाशीं रक्त सळसळून तापलं होतं, आणि डोळ्यांत सारखं पाणी जमा होऊं पहात होतं.

'एकटं एकटं कुठं तरी जाऊन बसावं आणि खूप रडून मन शांत करावं.' असा विचार तिच्या मनांत आला आणि ती घराच्या रस्त्याला वळली. पुनः तिचं तिलाच हंसू आलं. घरीं काय एकटं निवांत बसायला मिळणार आहे ? इन मिन दोन खोल्या. अंथरूण पसरून डोक्यावरून पांघरूण घेऊन निजलं तरी लगेच धाकटी वहीण जवळ येईल आणि म्हणेल, 'कां ग ताप आलाय् का? डोकं दाबू का?' आई तर उशाशींच येऊन बसेल आणि फौजदारा-सारखी प्रश्नांची सरबत्ती सुरू करील. 'खरंच' निवांतपणें जरा बसावं म्हटलं तरी मला या जगांत जागा नाहीं. उद्वेगानं ओठ चावून तिनं डोळ्याच

पाणी पुसलं आणि ती रस्त्यालगतच्याच मुलांच्यासाठीं केलेल्या बागेंत शिरली.

बागेंत नुकतीच मुलं जमूं लागलीं होतीं. हिरवळीवर, घसरगुंडीवर गटागटांनीं खेळ सुरू होता. झोपाळ्याचे झोके उंच उंच वर जात होते, आणि आनंदाच्या चीत्कारांनीं सारी बाग भरून गेली होती. एका झोपाळ्या-वर नुकतंच कुणी बसून गेलं होतं आणि तो रिकामाच हालत होता. तिनं चटकन् हातांतील पर्स खालीं हिरवळीवर टाकली आणि ती त्या झोपाळ्यावर जाऊन बसली. तिनं इतके उंच झोके घेतले कीं आजूबाजूंचीं मुलं पहातच राहिलीं. तिचं रडं हंसण्याच्या स्वरूपांत एकदम बाहेर पडलं. ती खूप हंसली. हंसत असतांनाच तिच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलं. घेरी येईपर्यंत तिनं झोके घेतले, आणि मग झोपाळ्यावरून उतरून ती बागेच्या एका निवांत कोपऱ्यांत जाऊन बसली. तिला खूप हलकं वाटलं, पण अजून मघाचं केशवचं बोलणं तिच्या मनांतून नाहींसं होत नव्हतं. सारखी सारखी त्याचीं तीं वाक्यं आठवत होती. आणि अपमानानं ती जळून जात होती.

ती ज्या ऑफिसमध्यें काम करीत होती त्याच ऑफिसमध्यें पण वेगळ्या डिपार्टमेंटमधें केशव काम करीत होता. त्यांची ओळख व्हायला फारसा वेळ लागला नाहीं. ऑफिसला येण्यासाठीं ती ज्या ठिकाणीं बससाठीं थांबे त्याच ठिकाणीं तो थांबत होता; मधल्या वेळीं ती दोघंही एकदमच चहासाठीं बाहेर पडत; घरीं येतांना ती पायीं येत असे. हळू हळू तोही पायींच येऊं लागला. मधून मधून समुद्रावर थोडा वेळ बसून मग ते घराकडे वळत.

त्या दिवशीं वाळवंटांत बसल्यावर वाळूशीं खेळत खेळत ती त्याला म्हणाली होती,

'काल मला बाबा म्हणाले कीं तुझ्यासाठीं एक स्थळ पाहिलं आहे— तुझा विचार सांग—'

'मग तुम्ही काय सांगितलं——— ?' तपकिरीची डबी उघडीत त्यानं विचारलं.

तिच्या कानाच्या पाळ्या एकदम तांबड्या लाल झाल्या. 'काय सांगावं ?

तुम्हांला काय वाटतं ? '

तिच्या चेहऱ्याचा शोध घेत तो म्हणाला,

'म्हणजे तुम्हांला असं नाहीं ना म्हणायचं कीं–' पण पुढें त्याला वाक्यच रचतां येईना.

तिनं एकदम प्रश्नार्थक डोळ्यांनीं त्याच्याकडं पाहिलं. तिच्या डोळ्यांकडे त्याला बघवेना. अस्वस्थपणानं त्यानं समुद्राकडं नजर लावली. बराच वेळ तो बोलला नाहीं, आणि मग हळूहळू म्हणाला,

'– माझा– माझा विचार काय कामाचा ? मी लग्नाचा विचारच करू शकत नाहीं– मुळींच नाहीं. '

'कां ? ' तिनं खालच्या मानेनं विचारलं.

'तुम्हां मुलींचं बरं असतं. लग्नाच्या निमित्तानं कुटुंबाच्या जबाबदारी-कडे तुम्ही खुशाल पाठ फिरवू शकतां. मला तसं कसं करतां येईल ?' माझ्या धाकट्या भावाचं शिक्षण मलाच पुरं केलं पाहिजे– घरीं पैसे पाठविले पाहिजेत-- आणि जरी लग्न केलं तरी तें तुमच्याशीं– तुम्ही शिकलेल्या आहांत, मिळवत्या आहां– तुमच्या आकांक्षा– तुमचं सुख– त्याचाही विचार करायला हवा.

'मला असलीं प्रवचनं नाहीं आवडत– तुम्हांला माझ्याविषयीं कांहींच नाहीं कां वाटत ? '

बराच वेळ तो बोलला नाहीं. मग मुठींत वाळू घेऊन ती जोरानं फेकून तो घाईघाईनं म्हणाला,

' कांहीं वाटलं तरी शक्य नाहीं–'

आतां मात्र तिचा राग उसळून आला. घरून येते वेळीं तिनं या प्रसंगाच जें चित्र रेखाटलं होतं, त्याच्याशीं हें वास्तव चित्र किती विसंगत होतं ! कल्पनेंतील चित्रांत त्याच्या हातांत हात घालून ती त्याला घरीं घेऊन येणार होती. मग आईनं चहा फराळाचं दिलं असतं, बहिणीनं लाजत लाजत त्यांच्याशीं गप्पा मारल्या असत्या, वडिलांनीं त्यांच्या नोकरीसंबंधीं बोलणीं केली असती आणि आतां वरचेवर आलं पाहिजे हं. असं म्हणत दारांतून

त्याला तिनं निरोप दिला असता. आणि मग तो दिसेनासा होईपर्यंत ती गॅलरींतून त्याला पहात उभी राहिली असती.... आणि आतां तो रुक्षपणानं म्हणत होता,

'मला शक्य नाहीं.'

तिनं आवेगानं तोंड झांकून घेतलं आणि कोरडया आवाजांत ती म्हणाली,

'आजवर तुम्ही माझ्याशीं इतक्या ह्यानं वागलांत— असं तुम्हीं कांहीं बोलाल अशी मला कल्पनाही नव्हती. तुम्ही फार चांगले आहांत अशी माझी समजूत झाली होती.'

'एखाद्या मुलीशीं थोडं स्नेहानं वागलं, आपलेपणानं वागलं तर ती लग्नासाठीं मानगटीला बसेल अशी माझीही कल्पना नव्हती. इतक्या शिक्षणा-नंतरही तुम्हांला परिस्थितीचं आकलन करतां येऊं नये ?— आश्चर्य आहे!'

आतां मात्र तिला असह्य झालं. आपला भयंकर अपमान झाला आहे असं तिला वाटलं. उठावं आणि त्याच्या दोन तोंडांत द्याव्या असाही विचार तिच्या मनांत येऊन गेला. पण तिनं मन आवरलं, ती तट्कन् उठली आणि तिथून निघून गेली.

निराशा आणि मानभंग या दोहोंनीं तिचं मन तडकल्यासारखं होऊन गेलं होतं, केशवचीं तीं वाक्यं आठवलीं कीं तिला आवंढा घोंटावा असं वाटत होतं आणि डोळ्यांत पाणी येत होतं. आणि ही तिची व्यथा कोणा-लाही सांगण्यासारखी नव्हती. तिलाच कुणीही मुर्खांत काढलं असतं.

एकदां तिच्या आईनं तिला छेडलं होतं. तिला त्या दिवशीं फिरून यायला उशीर झाला होता. ती घरीं आली, तो संतापानं लाल झालेली आई तिला सामोरी आली.

'अलीकडे नेहमीं उशीरा येतेस. समुद्रावर गेली होतीस ना ?'

आईची भेदक नजर चुकवत ती म्हणाली होती, 'हो, गेलें होतें.'

'मग, बरोबर कोण होतं तुझ्या ?'

'कोणी नाहीं.'

'खोटं बोलूं नको. तूं कुणाबरोबर तरी नेहमीं हिंडत असतेस असं मला कळलं आहे.'

'खोटं आहे तें.'

'पाहणारे खोटे आणि तूं सांगणारी खरी? ज्याच्याबरोबर फिरायला गेली होतीस त्याची जात, गोत ठावठिकाण—कांहीं माहीत आहे का तुला? अजून लग्न व्हायचं आहे तुझं, असं भलत्या सलत्या बरोबर हिंडणं फिरणं—पण तुम्ही शिकलेल्या—मिळवत्या—तुम्हांला आमचं सांगणं काय होय?'—असं बोलतां बोलतांच तिच्या आईनं डोळ्यांना पदर लावला होता.

आईला तरी कोणत्या तोंडानं ती ही गोष्ट सांगणार होती? आणि सांगून आईनं थोडंच तिचं सांत्वन केलं असतं?

या सगळ्या विचारांनींच तिच्या मनांत काहूर माजलं होतं. विचाराच्या भरांत आपण किती वेळ बसलों हें तिच्या लक्षांतच आलं नाहीं. 'आतां जावं घरीं' म्हणून ती उठली तों चांगलाच अंधार पडला होता. ती दचकली. झपझप पावलं टाकत ती घराशीं आली. गॅलरींत तिची बहीण मुसमुसत उभी होती.

'केवढ्या वेळची बाहेर राहतेस? तुझ्यामुळें आम्हांला मात्र बोलणीं खावी लागतात.' तिचं पुटपुटणं ऐकून घेत ती आंत आली.

'आल्या!' तिच्यापुढें हात नाचवीत तिची आई नाक उडवत म्हणाली. आणि तिनं खालीं बसून हुंदके द्यायला सुरवात केली. रडत रडत तिचं बोलणं चाललंच होतं.

'लोकं, शेजारी पाजारी, नाहीं नाहीं तें बोलतात, आणि मला खालच्या मानेनं ऐकून घ्यावं लागतं—मला नाहीं सहन होत—'

मग त्या संतापलेल्या चेहऱ्यानं खुर्चीवर स्वस्थ होऊन राहिलेल्या आपल्या पतीकडे वळून म्हणाल्या,

'तरी मी तुम्हांस सांगत होतें—कीं कॉलेज संपल्यावरोबर हिचं लग्न करून टाका—तर म्हणे नको—संसाराला हातभार हवा थोडा—मध्याचं शिक्षण होस्तंवर राहूं दे घरींच—घ्या आतां—'

आपला पति कांहींतरी बोलेल म्हणून त्या थोडा वेळ थांबल्या; पण त्यांनीं एक शब्दही उच्चारला नाहीं. तशा त्या चिडल्या.

'एक शब्दानं तुम्ही बोलत नाहीं तिला. पण सांगून ठेवतें; असं मूग गिळाल तर पोरगी तोंडाला काळं फासल्याशिवाय राह्यची नाहीं.'

बाहेरच्या खोलींत हीं बोलणीं चाललीं होतीं; आणि आंत ती हें सर्व ऐकत काम आवरत होती. जेवणं झालीं होतीं, पण उष्टीं राहिलीं होतीं, भांडीं घासायचीं होतीं. ती भांडीं विसळत असतांच तिची आई लगालगा आंत आली आणि म्हणाली,

'काय ग, ज्याच्याबरोबर हिंडतेस त्याच्यापास्नं लग्नाचं वचन तरी घेतलं आहेस का?'

तिनं हातांतील भांडं खणकन् मोरींत टाकलं. डोळे विस्फारून आईकडे पाहात उसळून ती म्हणाली,

'तुझं म्हणणं तरी काय? कुठल्याही पुरुषाची जरा ओळख झाली कीं लग्नासाठीं त्याच्या मानगुटीवर बसू कीं काय?'

कां कुणास ठाऊक, तें वाक्य आईच्या तोंडावर फेकल्यावर तिला आंत आंत मनांत कुठें तरी समाधान वाटलं. तिचा आवेश पाहून आई चूप झाली.

त्या रात्रीं तिचं जेवण राहूनच गेलं. ती स्वयंपाकघर धुवून गॅलरींत येते तों वडिलांनीं तिला हटकलं.–

'मग तुझा विचार काय ठरवला आहेस? त्या बर्व्यांना सांगू रविवारीं पहायला या म्हणून?'

'पण बाबा, मला इतक्यांत लग्न करायचं नाहीं. मधूचं कॉलेजचं शिक्षण पुरं झालं कीं मग पाहूं—'

'आणि–मघांपासून तुझी आई काय बोलते आहे तें ऐकलंस ना?–तरी–' त्यांचा संताप उसळून बाहेर येऊं पहात होता.

'बाबा तुमचा माझ्यावर विश्वास आहे ना?'

कांहीं न बोलतां वडील तेथून निघून गेले. किती वेळ ती रस्त्यावरची रहदारी पहात तिथें उभी होती! रात्रीं अंथरुणावर पडल्यावर तिच्या लक्षांत आलं कीं आपल्याला कडकडून ताप भरला आहे.

ज्या दिवशीं केशवाला ती बसस्टॉपवर दिसली तेव्हां त्याच्या लक्षांत

आलं कीं ती थोडी कृश झाली आहे. एखाद्या दुखण्यांतून उठावं तसा तिचा चेहरा मलूल दिसतो आहे. तो 'क्यू' मधें आहे हें कळूनही तिनं त्याच्याकडे पाहिलं नाहीं. तो ज्या बसमधें चढला तींत जागा असतांही ती दुसऱ्या बस-साठीं थांबली. दुपारीं तिनं टेबलावर चहा मागवला. संध्याकाळीं तो आप-ल्याबरोबर येईल असं वाटूनच कीं काय थोडासा वेळ तिनं ऑफीसमधेंच काढला आणि मग घाईघाईनं बस गांठली. आतां बरोबर साडेपांचच्या ठोक्याला ती घरांत येऊं लागली. शनिवारीं, रविवारींही बाहेर जायचं तिनं बंद केलं.

त्या दिवशीं केशवनं तिची भेट घ्यायचं ठरवूनच टाकलं होतं. ऑफीस सुटतांच तो तडक बस स्टॉपकडे धावला. बसमधें लोक चढत होते. ती चढण्याच्या तयारींत उभी होती. केशव तिच्यासमोर आला. तिनं दृष्टि वळवली. जागा भरल्यानं बस निघून गेली. तिनं लांबवर रस्त्यावर नजर टाकली. तिला हवी असणारी बस येत होती.

'आतांशा हें काय चालवलं आहे तुम्हीं?'

'तुम्हांला काय करायचं आहे?' फटकन् उत्तर देऊन ती बाजूला झाली. यणाऱ्या बसकडे पहात तिचा हात ओढून त्यानं तिला बाजूला घेतलं.

'मला थोडं बोलूं द्या. मग जा.'

त्यानं हात धरतांक्षणीं आपण झटकून टाकला नाहीं याचा तिला पश्चात्ताप झाला.

'तुम्ही असं कां वागतां?'

'माझी इच्छा—'

'हें काय उत्तर झालं?' तो रुक्षपणें हंसला. 'मी पाहतों आहे—तुम्ही मला टाळतां आहां—माझ्याविषयीं तुमचा वाईट ग्रह होण्यासारखं मी काय वागलों आहे?''

'फार चांगले वागलांत तुम्ही. झालं ना? जातें मी.'

'मीं फसवलं असं वाटतं तुम्हांला—'

'हो तुम्हीं मला फसवलंत—'

'काय बोलतां!' त्याचा चेहरा खर्रकन उतरला.

'--आणि म्हणूनच तुमच्याशीं एक शब्दही बोलूं नये असं मला वाटतं '

'जशी मर्जी-' असं म्हणत तो हळूं हळूं निघून गेला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे ती पहात होती. त्याचं खचलेलं मन त्याच्या गतींत तिला स्पष्ट दिसत होतं. बस येतांच ती भरकन् आंत चढली. त्या गर्दींत- त्या खडखडाटांत ती स्वतःला विसरून जाण्याचा प्रयत्न करीत होती. पण तें तिला शक्य होत नव्हतं....

'एखाद्या मुलीबरोबर ओळख वाढवायची, फिरायला जायचं, सिनेमाला जायचं. तरुण आपल्या आवडत्या तरुणीबद्दल जितकी आस्था दाखवील तितकी दाखवायची आणि मग म्हणायचं मला शक्य नाहीं- काय पण लबाडी.... आणि या विचाराच्या जंजाळांत एकच वाक्य तिला सारखं आडवीत होतं- 'तुमचा वाईट ग्रह होण्यासारखं मी काय वागलों आहे?' इथेंच तिचं विचारचक्र सारखं अडखळत होतं. रात्रीं ती झोपली ती या विचारांतच. दोनच दोन आठवणी तिच्या डोळ्यांसमोर चित्रासारख्या उभ्या राहिल्या.

एक नामांकित चित्रपट पाहण्याचा त्यानं तिला आग्रह केला होता. ती त्याच्याबरोबर गेली होती. जातांना तिच्या मनांत किती विलक्षण कल्पना घोळत होत्या. मित्राबरोबर सिनेमाला जाण्यांतील रोमान्स तिनं कथा कादंबऱ्यांतून वाचला होता- तिच्या वेड्या मनाला उगीचच हुरहूर लागून राहिली- चित्रपट सुरू झाल्यावर खरंच का हे माझा हात हातांत घेतील? पण तसा तिला मुळींच अनुभव आला नाहीं. तो तिच्याजवळ बसला होता, पण इतक्या आदबीनं! तो तिच्याशीं हळूं हळूं बोलत होता पण तें चित्रपटाबद्दल. ती आपल्याबरोबर सिनेमाला आली यानं त्याचं मन आनंदानं भरून आलं होतं. सिनेमाहून परतते वेळीं त्यानं तें वारंवार बोलूनही दाखवलं होतं.

या आठवणींत रेंगाळत असतांनाच तिला दुसरा प्रसंग आठवला.

'उद्यां माझा वाढदिवस आहे.' असं एकदां बोलतां बोलतां ती म्हणाली होती. तेवढं लक्षांत ठेवून दुसरे दिवशीं दुपारीं त्यानं हॉटेलमध्यें तिला छोटीशी पार्टी दिली होती. रात्रीं कशासाठीं तरी तिनं पर्स उघडली, तेव्हां तिला केवढा धक्का बसला होता? तींत एक चपटी निळी मखमलीची पेटी

होती, आणि त्यांत साधारण भारी किमतीच्या इयरिंग्जचा जोड चमकत होता. हें काम कुणाचं हें तिच्या लक्षांतच येत नव्हतं. दुसरे दिवशीं चहाचे वेळीं तिनं त्याला विचारलं,

'ते इयरिंग्ज तुम्हींच दिलेत ना?'

'केव्हां?– कधीं?––कसले?––' असं म्हणत तो इतक्या मोकळे-पणानं हंसला; आणि मग हंसणं लगेच आवरतं घेऊन म्हणाला,

'तुम्हांला इथंच दिले असते, पण– कुणाला ठाऊक तसं घेणं तुम्हांला आवडेल कीं नाहीं?— तुम्ही रागावाल अशी भीति वाटली; म्हणून–'

'अशी चोरून दिलेली भेट मी कधींच घेणार नाहीं.' असं म्हणत तिनं पेटी बाहेर काढली.

'खरंच परत देणार आहांत?' त्याचा आवाज एकदम उतरला. त्याच्या चेहऱ्यावरील ती विलक्षण हालचाल पाहून ती खुदकन् हंसली–आणि तिनं ते कानांत घातले.

'किती चांगल्या आहां तुम्ही!' असं म्हणत तो समाधानानं हंसला होता.

दुसऱ्या दिवशीं ऑफिस सुटतांच ती नेहमींप्रमाणें बसकडे थांबली. फुट-पाथवरून तो पायीं चालला होता. त्याला पाहतांच ती हंसली. आपण उलट हंसावं कीं नाहीं याचा त्याला विचार पडला.

'चालत निघाला?'

'हो' इतकंच बोलून तो गप्प झाला. तीही त्याच्यावरोबर चालूं लागली. तो म्हणाला,

'राग गेलेला दिसतो! फार रागावला होतां––'

'तुम्ही बोललातच तसं––'

'जाऊं द्या. आज मला इतका आनंद झाला आहे– आज खप लांब फिरायला जाऊं–'

'तुमच्यावरोबर बोलायची, भेटायची बंदी आहे मला.'

'अस्सं! आणि ती कुणी घातली आहे?'

'माझ्या पालकांनीं----'

'आणि तुम्ही पाळणार आहांत? वेडया आहांत, चला---'

त्याला काय उत्तर द्यावं तिला कळेना. तिला वाटलं त्याला ओरडून विचारावं.

'अरे, तूं सांगशील तें मी करावं, तूं देशील तें घ्यावं-तूं जें जें म्हणशील त्याला हो हो म्हणावं, पण तूं माझा- माझ्या भविष्याचा- माझ्या इच्छेचा विचार मात्र करूं नयेस--- हें काय हें तुझं जुलमी वागणं?'

पण हें बोलण्याऐवजीं ती नुसती हंसली आणि म्हणाली, 'चला कीं---'



# सर घरांत काम करूं लागले ... ४

'चलाग'–तिच्या मैत्रिणी जाण्यासाठीं एकदम उठल्या. ती त्यांना दारापर्यंत पोंचवायला आली. कुजबुजत झपझप पावलं टाकीत त्या रस्त्याला लागल्या. एकीनंही मागं पाहिलं नाहीं, कीं 'जाते' म्हणून पुन: तिचा निरोप घेतला नाहीं. त्यांच्या या उर्मट शिष्टाचाराला उद्देशून तिनं मान वेळावली आणि दार बंद केलं. तिनं एकवार घड्याळाकडे ओझरतं पाहिलं आणि पदर खोचत ती स्वयंपाकघरांत आली. खणकन् स्टोव्ह खालीं काढला. करंडींतले कांदे उभ्याउभ्याच खालीं टाकले. रागारागांतच वरवंटा पुढें ओढून नारळ फोडला. तो उभाच फुटला आणि सगळीकडे पाणी उडालं. अशाच तऱ्हेनं सारी कच्ची तयारी करून ठेवून ती पुन्हां बाहेरच्या खोलींत आली. कांद्या-कोथिंबिरीचा वास तिच्या भोंवतीं दरवळत होता; कांद्याच्या दर्पानं डोळे तांबडे झाले होते. आणि नारळाचीं तुसं साडीला चिकटलीं होतीं. तशीच ती डोक्यामागें हात घेऊन आरामखुर्चीवर आडवी झाली आणि कांहींशा हेकेखोरपणानं समोर पहात राहिली. त्या मैत्रिणी निघून गेल्यापासून तिच्या कपाळावर भुवयांच्या मधोमध जी अढी पडली होती ती अजून नाहींशी झाली नव्हती.

अलीकडे वारंवार अशी अढी तिच्या कपाळावर दिसूं लागली होती.

'लग्न झाल्यावर कध्धीं कध्धीं शिकूं नये; आणि ज्या कॉलेजमध्यें आपला नवरा प्रोफेसर आहे त्या कॉलेजमध्यें तर मुळींच शिकूं नये. मुळांत लग्नच करून घेऊं नये मुळीं.'

सूक्ष्म दृष्टीनं पाहणाराला त्या अढींत वरील वाक्यं कोरलेलीं दिसलीं असतीं. बरोबर पंधरा दिवसांपूर्वीही अशीच अढी तिच्या कपाळावर उमटली होती.

त्यांच्या कॉलेजचं गॅदरिंग होणार होतं. त्यांत मुलींनीं एक नाटक बसवायचं ठरवलं होतं. मुली अगदीं उत्साहानं त्या कामांत पुढाकार घेणार होत्या. पण नायिका कुणाला निवडावं याचीच त्यांना फिकीर पडली होती. ज्या देखण्या होत्या त्या लाजाळू होत्या, ज्या गाणाऱ्या होत्या त्या रूपानं नायिका होण्याला योग्य वाटत नव्हत्या. त्या नाटकांतूनच जन्माचं नाटक निर्माण होईल म्हणून कांहींच्या पालकांनीं परवानगी साफ नाकारली होती, आणि कांहींचा उत्साह दुर्दम्य असला तरी त्या प्रेक्षकांना नकोशा होत्या. साहजिकच नायिकेची माळ निर्मलेच्या गळ्यांत घालण्याचं सर्वानुमतें ठरलं. ती देखणी होती तसा तिचा गळाही गोड होता. ती त्याच कॉलेजमधील प्रोफेसरची पत्नी होती, अर्थात जबाबदार व्यक्ति या नात्यानं अशा कामाला हातभार लावणं हें तिचं कर्तव्य ठरणार होतं. तिचा नवरा कांहीं संस्कृतचा किंवा फिलॉसफीचा प्रोफेसर नव्हता कीं जो तिला परवानगी देईल कीं नाहीं याची शंका यावी. सर इंग्रजीचे प्रोफेसर होते. उमदे तरुण होते. शिकवतांना विनोद निर्माण करून, कोटया करून वर्गांत खेळकर वातावरण निर्माण करीत होते. हें सगळं लक्षांत घेऊन पंधरा दिवसांपूर्वी एक मुलींचा मोर्चा तिच्या घरावर आला होता.

नाटकांत नायिकेचं काम करण्याची कल्पना कॉलेजमधील कुठल्या मुलीला मोह घालणार नाहीं ? त्या भरांत निर्मला म्हणाली,

'हो. हो. मी करीन कीं. आणि गोखल्यांनाच ( ती नवऱ्याला आडनांवानं हाक मारीत असे ) डायरेक्ट करायला सांगू आपण.'

मग मुली तर अधिकच चेकाळून हंसल्या. सगळं कांहीं ठरल्यामुळें तिच्या भाषणाची कॉपी तिच्या पुढें टाकून त्या विजयी वीरासारख्या निघून गेल्या.

फर्र् आवाज करणारा स्टोव्ह बंद केल्यावर जसं एकदम शांत शांत वाटतं तसं तिला वाटलं. आपण आतां नायिकेचं काम करणार या दिमाखांत तिनं गोखले सरांच्या फोटोसमोर उभं राहून गाण्याची तालीम केली.

आणि मग एकदम तिच्या लक्षांत आलं. 'पण आपण अजून गोखल्यांना विचारलं नाहीं. त्यांच्या संमतीशिवायच हें सारं—' सुप्त भीतीनं तिचा चेहरा थोडा उतरला. तरी पण तिनं ती भीति बाजूला सारली आणि ती पलंगावर पडल्या पडल्या आपलं भाषण चाळून पाहूं लागली. चार पानं तिनं परतलीं असतील नसतील तोंच गोखलेनीं दारावर टक् टक् केलं. घाई-घाईनं वही गादीखालीं दडपून तिनं दार उघडलं.

गॅदरिंगच्या धमालींत किती दगदग होणार आहे याचं वर्णन करत सरनीं कपडे बदलले; थंड पाण्याच्या शिडकावानं त्रस्त चेहरा प्रसन्न करण्याचा प्रयत्न केला आणि ते स्वयंपाकघरांत आले. निर्मलेनं चिवडयाची वशी त्यांच्या हातांत दिली आणि चहाच्या कपांत साखर टाकली.

'काय फक्कड झालाय चिवडा—' म्हणत त्यांनीं दुसरा बोकणा भरतांच निर्मला खुदकन् हंसली.

'पण या चिवडयासाठीं मी शेवटचे दोन तास चुकवले महाराज.'

'छान. वेळ सत्कारणीं लागला. असंच रोज करत जा.' असं म्हणत सरनीं डब्यांतून आणखी चिवडा वशींत ओतून घेतला.

हें सगळं पाहून निर्मलेनं गोष्ट काढली—

'आज कॉलेजच्या मुली आल्या होत्या.'

'कशाला?'

'मुलींचं नाटक होणार आहे ना? मला नायिकेचं काम कर म्हणतात. तेवढयासाठींच आल्या होत्या.'

सरनीं चहाचा कप खालीं ठेवला.

'कुणाला? तुला! वऱ्याच दिसतात कीं, तुला नाटकांत काम करायला सांगायला. तूं म्हणजे परसांतली भाजी वाटलीस काय त्यांना? नॉन्सेन्स!'

हें ऐकल्यावर निर्मलेला वाटलं आपण काम करीन असं कबूल केलं आहे हें सांगितलं नाहीं हें किती बरं केलं.

' मग आम्ही नाटकांत काम करूं नये वाटतं ? ' —रुसव्याचा आव आणून तिनं दुबळा प्रयत्न केला.

' करा कीं. नको कोण म्हणतो. ' असं म्हणत शीळ घालीत सर बाहेर गेले आणि वर्तमानपत्र वाचण्यांत गुंतले. जातांना त्यांच्याकडे पहात असतांच तिच्या भुवयांच्या मधोमध अढी उमटली. आणि ती कोंडलेल्या आवाजांत पुटपुटली,

' कध्धीं कध्धीं लग्न करून घेऊं नये. ' तिच्यांतील विद्यार्थिनी उसळून वर येत होती आणि म्हणत होती,

' काय मूर्ख आहेस तूं? कॉलेजच्या आयुष्यांत केव्हढी चांगली संधि आलीय तुला. एवढी काय तुला गोखल्यांची भीति वाटते? तुझं म्हणून तुला मत आहे कीं नाहीं? दुबळी कुठली! '

तिच्यांतील पत्नी दुबळेपणानं सांगत होती,

' नाटकांत काम करायला मला नको असं थोडंच आहे. पण गोखल्यांना जर पटत नाहीं तर उगाच हट्ट धरणं बरं काय? त्यांना विरोध करणं मला जमतच नाहीं. मी तरी काय करूं? ते जर रागावले तर मला, कां कुणाला ठाऊक, भीति वाटते. '

दुसरे दिवशीं कॉलेजमध्यें जातांच तिनं ेव्हां वही परत केली आणि मला जमणार नाहीं असं सांगितलं तेव्हां लेडीजरूमला मोठा धक्काच बसला.

' अग, कां पण? कां? ' मधमाशांनीं झेप घालावी तशी मलींनीं झेप घातली.

' मला नाहीं ग जमायचं ' असं त्रासिकपणें बोलून ती त्यांना बाजूला सारीत लेडीजरूमच्या बाहेर निघून गेली. वाचनालयांत जाऊन तिनं पुस्तक उघडण्याचा देखावा केला.

तिच्या कपाळावरील अढी पाहून तिला कुणीतरी विचारलं,

' काय मिसेस गोखले, डोकं बिकं दुखतंय कीं काय? '

त्यानंतर पंधरा दिवसांनीं तिच्या मैत्रिणी तिच्या घरीं आल्या होत्या.

आज रात्रीं त्यांचं नाटक होतं. नाटकाचा पडदा वर सरकण्याच्या पूर्वी निर्मलेचं भावगीत गायन ठेवावं अशी त्यांची योजना होती.

'ए आतां तरी नाहीं म्हणू नकोस बाई–'

'ए असं काय ग करता–मला नका बाई आग्रह करू–' ती गयावया करून सांगत होती. आणि या आग्रहांतून सुटावं म्हणून एकदम ती बोलून गेली,

'मी गायले असते, पण गोखल्यांना नाहीं आवडत–'

'अय्या! ' एकदम पांच सहा आवाज निघाले.

'अस्सं! तरीच बरं कां–' एकटी इतकंच बोलून गप्प बसली.

एक धिटुकली म्हणाली,

'असे आहेत काय सर? परवां वर्गांत हिंदुकोडाविषयीं बोलणं निघालं तर काय म्हणाले आहे माहीत? ही विवाहसंस्था जर स्त्रियांचं व्यक्ति-स्वातंत्र्य बरबाद करणार असेल तर ती अत्यंत घातक अशी संस्था आहे असं समजलं पाहिजे.....'

तिची ही इंग्रजी नक्कल चांगली वठली म्हणून मुलींनीं टाळ्या पिटल्या.

'अग ते वर्गांत प्रोफेसर असतात.' एकटी हळूच म्हणाली.

निर्मलेला हें सर्व असह्य झालं.

'ए' तुम्ही गप्प बसतां कीं नाहीं? जा पाहूं आतां–' असं म्हणत ती उभी राहिली. तशा मुलीही एकदम उठल्या. ती त्यांना दारापर्यंत पोचवायला आली. तरी त्यांनीं मागें वळून पाहिलं नाहीं. तिच्या कपाळावर भुवयांच्या मध्यें पुन्हां अढी उमटली.

आणि ती अशा मनःस्थितींत असतांनाच गोखले सरनीं दारावर टक् टक् केलं. तिनं रुसव्यांतच दार उघडलं. गोखले आंत आले ते तसेच हुश्श करीत खुर्चीवर बसले. तिच्या चेहऱ्यावरील भाव जाणण्याच्या मनःस्थितींत ते नव्हते.

'निमा, मला वेळ नाहीं हं. दहा मिनिटांत आण पाहूं कांहीं तरी खायला. आज रात्रीं मी जेवणारही नाहीं. वेळच होणार नाहीं.'

निर्मलेनं मुकाट्यानं पोहे केले. नेहमीं स्टोव्ह पेटला कीं त्या सुरावर तिचं संगीतही सुरू होई. पण आज चहा पोहे मुक्यानंच झाले. कांहीं न बोलतांच तिनं ट्रे टेबलावर त्यांच्यासमोर ठेवला. आणि कांहीं न बोलतांच ती खुर्चीवर बसून राहिली. सरनीं भराभर बशी रिकामी केली. दीड दोन कप चहा तसाच कढत कढत ढोसला. डोक्यावर पुनः हॅट चढवीत ते खुर्चीवरून उठलेच. जातां जातां, ओठांत सिगरेट धरून बोबड्या स्वरांत ते म्हणाले,

'ए, पण साडेनऊला कपडे करून तयार रहा हं. मी येईन तुला घेऊन जायला.'

'हं' म्हणत तिनं दार बंद केलं.

रात्रीं ती मोठ्या थाटामाटानं गोखल्यांच्या बरोबर कॉलेजमध्यें गेली कॉलेजच्या आवारांत भव्य मंडप घालून आंत नाटकाची व्यवस्था केली होती. ती तिथें पोचली तेव्हां मंडपांतील साऱ्या खुर्च्या चिक्कार भरून गेल्या होत्या. स्टेजवर कुणीच नव्हतं; पण आंत कांहीं धांवपळ चालल्यानं पडदा सारखा हलत होता. स्टेजच्या पुढून, मधल्या रांगांतून हिरव्या, तांबड्या फिती छातीवर लटकवलेले स्वयंसेवक धांवपळ करीत होते. कांहीं प्रोफेसरही मानेवरचा घाम पुसत लांब टांगा टाकत इकडून तिकडे जात होते. विद्या–र्थ्यांच्या खास जागांतून एकच गोंधळ चालला होता. शिट्टया फुंकल्या जात होत्या. एकमेकांना मोठ्यानं हाकाही मारल्या जात होत्या.

प्रवेशद्वारांतून आंत शिरतांच तिचे डोळे विजेच्या झगझगाटानं दिपल्या-सारखे झाले. एका स्वयंसेवकानं सहास्यमुद्रेनं त्यांचं स्वागत केलं.

'सर, तुमच्या जागा इकडे राखून ठेवल्या आहेत या.' असं म्हणून तो पुढें झाला.

'मी बसते ना मुलींमध्यें' निर्मला मागून हळूच म्हणाली.

'पण आम्ही दोन खुर्च्या मुद्दाम राखल्या आहेत.'

स्वयंसेवकाचे हे शब्द कानीं पडतांच ती निमूटपणें गोखल्यांच्या मागून निघाली. आपल्या बरोबरीच्या मुलींत बसून मजा करायची हौस तिला भागवतां आली नाहीं, तरी ती फारशी खट्टू झाली नाहीं. रांगाच्या रांगा

ओलांडून आपण पुढच्या रांगेंत जात आहोंत आणि भोंवतीचे लोक आपल्या थाटामाटाकडे पहात आहेत. कॉलेजचीं पोरंही टक लावून पहात आहेत, या जाणीवेनं तिचं मन थोडं फुगलंच. आपल्या जागेवर येतांच ती जरा नाराज झाली. तिच्या बाजूच्या खुर्चीवर व्हाइस प्रिन्सिपॉलसाहेबांची आई बसली होती, आणि पुढच्या रांगेंत खुद्द प्रिन्सिपॉल व पाहुणे तिच्या समोरच होते. म्हणजे आतां तिला गोखल्यांच्या बरोबरही मोकळेपणानं बोलतां आलं नसतं.

नाटकांत काय काय गमती होत होत्या. तिला अगदीं खो खो हंसावं असं वाटत होतं. एका पुरुषपात्रांतील मुलीनं मिशा लावल्या होत्या आणि ती सारखी तोंडावर हातरुमाल दाबून बोलत होती. एकटी बोलतांना सारखी एका पायाव न दुसऱ्या पायावर डुलत होती.

निर्मलेनं एकदां मध्येंच गोखल्यांकडे पाहिलं. पण त्यांना या गंमती कळत नसाव्या, ते खुर्चीच्या पाठीच्या कडेवर मान टेकून एकचित्तानं नाटक पहात होते. मागून विद्यार्थ्यांच्या जागेंत जरा कुठें खुट् झालं कीं रागावल्या-सारखे मागें वळून बघत होते. एकदां तर उभे राहून 'शांत व्हा' ची खूण त्यांनीं केली.

एक अंक संपतांच कांहीं विद्यार्थिनी घोळक्यानं रंगपटाकडे जातांना तिनं पाहिल्या. तिच्या वर्गातील त्या मुली होत्या. कुणाला शाबासकी द्यायला, कुणाला सूचना द्यायला त्या जात असाव्या. मधेंच त्यांना दिग्दर्शक प्रोफेसर भेटले तेव्हां त्यांच्या भोंवतीं कोंडाळं करून त्या उभ्या राहिल्या. त्या अगदीं तोंड भरून सरांची स्तुति करत होत्या हें त्यांच्या हावभावावरून तिला कळत होतं. आपणही जावं, त्या मुलींत मिसळावं, खूप गंमत करावी, आणि पुन्हा म्हणून ह्या वृद्धिजड रांगेंत येऊं नये, असं तिला वाटलं. गोखले प्रिन्सि-पॉलशीं बोलण्यांत गुंतले होते. तिनं एका आवंढ्याबरोबर मनांतील इच्छा गिळून टाकली आणि खुर्चीतल्या खुर्चीत थोडी चाळवाचाळव करून ती चूप बसली. आपल्या शेजारीं आपली पत्नी बसली आहे याची गोखल्यांना जणूं यादच नव्हती. का पत्नीशीं बोलत राहण्यांत त्यांना कमीपणा वाटत होता? याच कल्पनेनं तिला गोखल्यांचा भयंकर राग आला. त्यांच्याकडे पहायचंसुद्धां नाहीं असा निश्चय करून ती समोर रंगभूमीवर पहात राहिली.

दुसऱ्या अंकाच्या शेवटीं गाणं थांबलं आणि टाळयांचा कडकडाट झाला. विद्यार्थ्यांतून ' वन्स मोअर'ची एकच आरोळी उठली. पण पडदा खालीं आला.

' इश्श ! काय पण गाणं म्हणते ! ' निर्मला कडवटपणानं पुटपुटली. आपण याहूनही सुंदर म्हटलं असतं या कल्पनेनं तिचं मन ताणल्यासारखं झालं. आणि त्या भरांत मानेला एक झटका देऊन तिनं गोखल्यांच्याकडे पाहिले.

गोखले सर उठून उभे राहून कॉलर नीट करीत तिला म्हणत होतें, ' जरा रंगपटांत जाऊन येतों. ' ते रुबाबांत स्टेजसमोरून जातांना ती ओठ मुडपून रुक्षपणानं पहात राहिली, आपल्याला बरोबर बोलावलं नाहीं याचा तिला अपमान वाटला. आपणच त्यांना न विचारतां जावं उठून, असाहि विचार तिच्या मनांत उसळून आला. ती अर्धवट उठली, आणि पुनः त्या शेजारच्या रिकाम्या खुर्चीकडे पाहून गप्पकन खालीं बसली. दाव्याला बांधलेल्या गायीनं मानेला ओढ घेऊन परत स्थिर व्हावं तशी. आपलं डोकं भयंकर दुखत आहे असं तिला वाटलं. प्रकाश तिच्या डोळयांना असह्य वाटायला लागला. गोखले परत खुर्चीवर येतांच ती म्हणाली,

' माझं डोकं भयंकर दुखायला लागलं आहे. जाऊं या आपण. '

गोखल्यांनीं जरा सहन करण्याचा उपदेश केला तशी ती खवळली.

' मी जाते मग. मला मुळीं बसवतच नाहीं. ' असं म्हणत कपाळ चिमटीत धरीत ती उठली. गोखलेही तिच्या मागून उठले. अंक सुरू झाला होता. सर्व थिएटर चित्रासारखं स्तब्ध होतं. ती दोन्ही रांगांमधून सावकाश पावलं टाकत जात होती. आपल्या मागून गोखले येत आहेत या जाणीवेनं तिचीं पावलं अधिकच सावकाश पडत असावीं.

प्रवेशद्वाराजवळ स्वयंसेवक म्हणाला,

' सर, हें काय, निघालात ? हा अंक तर मुद्दाम पहायला हवा. '

' हिला जरा बरं वाटत नाहीं. हिला पोचवून येईन मग-- '

रस्त्याला लागतांच निर्मला उसळून म्हणाली, ' तुम्हाला परत यायचं असलं तर जा ना आतांच. मी जाईन एकटी. '

'अग, मग काय, त्याला काय येणार नाहीं म्हणून सांगूं? कळतच नाहीं तुला.'
पण निर्मलेची आणखी एक तक्रार उसळून आली.

'आणि त्या आमच्या वर्गातल्या पोरटयासमोर मला, हिला हिला काय करता—मला राग येतो अशानं!'

'तुझं डोकं दुखतंय हें मात्र मला आतां पटल वरं का.' गोखले सर हंसत म्हणाले.

अंधारांत कुणाला दिसत नसली तरी निर्मलेच्या कपाळावर ठराविक अढी उमटली होती. मनःक्षोभांत तिनं आपला चालण्याचा वेगही वाढवला होता. घरीं येतांच ती कपाळ दोन्ही हातांनीं गच्च दाबून धरून आपल्या कॉटवर पडली. गोखलेनीं कपाटांतून डोकेदुखीवरील गोळी आणि पाण्याचा ग्लास तिच्या पुढें आणून धरला. मुकाटयानं तिनं तें औषध घेतलं आणि ती स्वस्थ पडून राहिली. आपलं डोकं दुखणं कधीं थांबलं हेंहि तिला कळलं नाहीं; आपणाला झोप कधीं लागली हेंहि तिला समजलं नाहीं. सहा वाजतां दारावरची घंटी वाजतांच तिला नेहमींप्रमाणें जाग आली. दूधवाला आला होता. रोज ती याच वेळीं उठत असे. तिचं घरांतलं सर्व काम संपलं, चहा तयार झाला म्हणजे मग सावकाश आठ साडेआठला गोखले उठत. दुसऱ्यांदा घंटी वाजली तशी ती अंथरुणांतच उठून बसली. उठून दूध घेतलं पाहिजे; मग केरवारा, मग अमूक, मग तमूक, तिच्यांतील गृहिणी तिला डिवचूं लागली; पण तिला काय वाटलं कुणाला ठाऊक, ती पुनः झोपली आणि तिनं तोंडावरून हलकेच पांघरूण ओढलं. काल रात्रीचं नाटक ती विसरून गेली होती. आपला मनस्ताप तिला आठवत नव्हता; नाटक पुरतं पहायला मिळालं नाहीं ही हुरहूरही तिला दुखवीत नव्हती. भर नाटकांतून उठून गोखले आपल्या मागोमाग आले या कल्पनेचं विचित्र सुख तिला सुखवीत होतं. त्या सूक्ष्म सुखाचीच तिला ग्लानि आल्यासारखी झाली होती. कसल्या तरी समाधानाची किल्ली आपल्याला सांपडली आहे असं तिला वाटलं होतं. आणि ती किल्ली आतां ती चालवून पाहणार होती.

तीन चारदां घंटी वाजल्यावर गोखले सर एकदम उठून बसले. त्यांनीं निर्मलेला हाक मारावी असा विचार केला. पण तिला स्वस्थ झोपलेली

पाहून ते स्वतःच उठले. त्यांनीं दार उघडलं, आणि ते स्वयंपाकघरांत गेले. भांड्यांचा आवाज येतांच निर्मलेला एकदम जाणीव झाली, गोखले नेहमीच्या ठराविक भांड्यांत दूध नाहीं घेणार. दुसरंच कुठलं तरी भांडं पुढं करतील. तिनं मोठ्यानं ओरडून सांगितलं,

'अहो, त्या स्टेनलेसच्या पातेलींत दूध घ्या बरं का—नाहींतर घ्याल भलत्याच भांड्यांत.'

गोखलेनीं ती सूचना ऐकली, निर्मलेनं आपणाला इतकं मूर्ख समजावं याचा विचार करीत ते भांड्यांत दूध घेऊं लागले. गवळ्यानं ती सूचना ऐकली व त्यांच्याकडे पाहून तो हंसला म्हणून त्यांना त्याचा राग आला.

'चांगलं घालत जा दूध' असं उगीचच त्याच्यावर डाफरून ते दूध घेऊन स्वयंपाकघरांत गेले. अजून निर्मला उठली नव्हती. मग त्यांनीं स्टोव्ह पेटवला, कपबशा काढल्या; खरकटीं भांडीं बाहेर ठेवलीं. कोळशाच्या डब्यांतील एक एक कोळसा चिमट्यानं उचलून शेगडींत घातला, आणि शेगडी पेटवली.

हें सगळं काम करीत असतांना गोखले सरांचं मन एका उच्च, उदात्त पातळीवर हेलकावे खात होतं. निर्मला चांगली धडधाकट असल्यानं लग्न झाल्यापासून ती आजारी अशी कधींच पडली नव्हती. गोखले सरांना घरांत इकडची काडी तिकडे करावी लागत नव्हती. पण आज पत्नीसाठीं आपण कांहीं तरी करीत आहोंत या भावनेनं त्यांचं मन सुखावलं होतं. एकादा श्रीमंत माणूस गरिबाला थोडं फार दान देतो तेव्हां त्यालाही अशाच प्रकारचं उदात्त सुख होत असावं.

इकडे निर्मला 'बेड टी' ची वाट पहात गमतीनं पडून राहिली होती. स्टोव्ह पेटविते वेळचा स्पिरिटचा वास तिच्यापर्यंत आल्यावर तिला किती बरं वाटलं होतं. घरांतील सरांच्या कामाची जशी जशी तिला चाहूल लागत होती तशी तशी ती उशींत अधिकच मस्तक रुतवून सुखानं आंवढा गिळत होती. तिला हव्या असणाऱ्या समाधानाच्या पहिल्या घोटांनींच तिला इतकं वेड केलं होतं. तिच्या समाधानाची किल्ली तिला मिळाली होती. ती चालविण्याची कुशलताही तिच्या अंगीं होती. आतां यापुढें तिच्या कपाळावर ती ठराविक अढी कधींच पडणार नव्हती.

# आजोबा ... ५

दहा माणसांच्या घरांत वर्दळीला काय तोटा! पण आजोबांना त्या वर्दळींतहि एकटं एकटं वाटत होतं. आजोबांचं घर खूप मोठं होतं. त्या घरांत वावरणारी मंडळीहि बरीच होती. दोन मोठे मुलगे, त्यांच्या बायका, शाळा कॉलेजांत शिकणारीं नातवंडं अशा भरल्या घरांत ते होते. सोप्यावर मोठ्या मुलाचं वकिलीचं ऑफिस तर पुढच्या माडींत धाकट्या मुलाची दवाखान्याची उपशाखा. माजघरांतील बाजूच्या खोल्यांतून सुनांची, नातींची वर्दळ आणि मागल्या माडींत नातवांच्या अभ्यासाच्या खोल्या. या दारांतून त्या दारांत या खोलींतून त्या खोलींत माणसांची सारखी जा ये सुरू असे.

‘ ए आई, बाहेर कुणी आलय. दादांनीं चहा करायला सांगितलाय– ’

असं घाईघाईनं म्हणत एक नात मुसाट स्वयंपाक घरांत धावे. तर घड्याळांत पांचाचे ठोके ऐकतांच–

‘ बाई–मी मंडळांत जाते वरं का–’ असं जरा मोठ्यानं बोलून धाकटी सून ठसक्यांत बाहेर निघून जाई.

बाहेरून मोठ्या नातवाबरोबर चारपांच तरुण मित्र घोळक्यानं येत आणि दाणदाण पायऱ्या वाजवीत वर निघून जात.

या साऱ्या वर्दळीकडे पहात आजोबा स्वस्थ बसून असत. स्वयंपाक घराच्या दारांशीं त्यांचा पाट मांडलेला असे. माजघरांत त्यांची खाट असे. झोपेची वेळ

सोडून बाकी सारा वेळ ते पाटावर बसून रहात. बघत बसत. बघतां बघतां डोळे थकायचे–डोळ्याच्या टोकाला मळ साचायचा–पाणी जमायचं–पण ते उपरण्यानं पुसून पुन्हां बघत रहात. सिनेमा नाटक आपल्याला दोनतीन तास बघायचं असतं–म्हणून ठीक. शिवाय त्या समोर चाललेल्या खेळांत आपणहि समरस होतों म्हणून मन रमतं. पण आजोबांना, ज्या खेळापासून मन अलिप्त आहे असा खेळ दिवसभर पहावा लागत होता. त्याला ते कंटाळले होते.

त्या घरांत त्यांच्या वाटणीला कांहींच नव्हतं. जें कांहीं होतं तें मुलांचं, सुनांचं, नातवंडांचं. आणि ते– त्यांच्याशीं बोलायलाहि कुणी नव्हतं. मुलगे आपापल्या व्यापांत म्हणून–अशा या ना त्या कारणांनीं त्यांच्याशीं बोलायला असं कुणीच उरत नसे. भोंवती भोंवती राहणारी गोष्ट सांगा म्हणणारी मुलं आतां मोठीं झालीं होतीं. तीं आजोबांच्याकडे ढुंकूनहि पहात नव्हतीं. जोंपर्यंत अंगांत ताकद होती तोंपर्यंत आजोबा–देवदर्शनाला, कथा पुराणाला जात. सकाळीं संध्याकाळीं फिरायला जात. पण पाय थकले आणि घराच्या बागेंत फिरणंच त्यांना कष्टाचं वाटूं लागलं. मग ते वकिलाच्या ऑफिसांत एका आराम खुर्चीवर बसू लागले. आलेल्या आशिलाशीं देवाधर्मावर वाद घालूं लागले.

आपल्या वडिलांचा तो म्हातारपणाचा धोतर उपरण्याचा पोषाख, त्यांचं ते रेकत रेकत बोलणं–मधून मधून उबळ येऊन खोकणं, नाक शिंकरणं या गोष्टी कामकाजांत गुंतलेल्या त्यांच्या मोठ्या मुलाला अस्वस्थ करूं लागल्या. वकीलसाहेब कागदपत्र हातीं घेऊन अशिलाशीं चर्चा करूं लागले कीं तिकडे आजोबांची चर्चाहि सुरू व्हावी.

‘अहो हल्लींच्या लोकांचा देवावर विश्वास आहे कुठं ?’ असं आवेशानं थरथरत ते म्हणत. आणि वकील साहेबांच्या पित्याला मान देण्यासाठीं समोरचा अशील मान डोलवी.

‘खरं आहे आपलं आजोबा, अगदीं खरं आहे.’

कुणीतरी थोरामोठ्या घरच्या स्त्रिया रेशमी पातळं सावरीत आल्या कीं वकील साहेबांना आजोबांची उपस्थिति अधिकच जाणवायची आणि ते,

अधिकच अस्वस्थ व्हायचे. पण कसं सांगायचं आणि काय सांगायचं हें त्यांना सुचत नव्हतं. शेवटीं एकदां त्यांनीं तो धीर करायचं ठरवलं.

अशीच एकदां आजोबांची चर्चा रंगांत आली होती. आणि त्यांच्या मोठ्या नातवानं त्यांना आंतून हांक मारली.

' आजोबा, जरा आंत या. '

आजोबा कष्टानं आरामखुर्चीवरनं उठले आणि हळू हळू आंत गेले.

नातवानं वेछूटपणें सांगितलं,–

'हे बघा आजोबा–आतां कुणी साहेब येणार आहेत दादांच्याकडे. तेव्हां तुम्ही आंत बसा. बाहेर जाऊं नका.'

असं सांगून तो जिन्यावर पाय वाजवीत वर निघून गेला. आजोबांची वादविवादाची ऊर्मि एकदम थांबली. त्यांनीं 'बरं वरं' म्हणत खोकल्याची उबळ थांबवली. नेहमीच्या संवयीनं उपरण्याच्या टोकानं डोळ्यांत नेहमींच सांचून राहणारं पाणी पुसलं. खोकल्याच्या दमानं हास् हुस् करीत ते स्वयंपाक घरांत गेले. भिंतीशीं टेकून ठेवलेला पाट त्यांनीं थरथरत्या हातांत घेतला. आणि स्वयंपाक घराच्या दाराशीं तो टाकून त्यावर बसून राहिले. स्वस्थ बसून राहिले. पुन्हा ते बाहेर जाऊन कधींच वसले नाहींत. दाराशीं पाटावर ते बसून राहूं लागले. त्यांची चर्चा बंद झाली. बोलणं बंद झालं. बोलणार कुणाशी ? थोरली सून खाण्यापिण्याच्या निमित्तानं त्यांच्याशीं एकादा शब्द बोले. पण त्या दिवसापासून त्या सुनेशीं बोलण्याचं त्यानीं वंद केलं. मुलावरचा राग ते सुनेवर काढूं लागले.

आपलं आन्हिक आटोपलं कीं पाटावर बसून रहायचं. दुपारी बारापर्यंत स्वयंपाक घरांत दोन्ही सुनांचा वावर असे–तो पहाण्यांत त्यांचे तास्न तास जात. बाहेरून कोण येतं, कुठं जातं, जिन्यावरून कोण येत, कोण भाजी चिरतं, कोण ताक करतं, तव्यावर हात भाजतांच कोण कसं दचकत, कोण कसं जेवतं. वाकून आवराआवर कोण कशी करतं, न्हाणी घरांतून पदरानंच कपाळ टिपीत कोण कसं बाहेर येतं.–

हें सारं पहात रहायचं. यांतच आजोबांचा जीव रमूं लागला. आपली

किलकिली नजर ते सारखी या साऱ्या हालचालीवरून फिरवीत रहात. दांत नसल्यानं मिटलेले ओठ सारखे हालायचे आणि अशी ही नजर सारखी फिरत रहायची. स्वयंपाक घराच्या हालचाली इतक्या लक्ष्यपूर्वक कधींच त्यांनीं पाहिल्या नव्हत्या. आतां त्यांत त्यांना नावीन्य वाटूं लागलं. त्या सर्व हालचाली मन लावून पहाव्या असं वाटूं लागलं असा कांहीं तरी उद्योग मनाला लावून घ्यायला हवाच होता. त्याशिवाय त्यांचा वेळ तरी कसा जाणार होता !

त्या दिवशीं दुपारीं धाकटी सून थोरल्या सुनेला सांगत होती–

' हा काय बाई खडा पहारा दाराशीं. यांच्या अंगावरनं सारखं वावरायचं म्हणजे नको वाटतं.

' नाहीं तर काय ? आणि आपलं सारखं टकाटका बघत रहातात. '

' ही काय बाई म्हातारपणीं बुद्धि '–

' मी आतां यांना सांगणार आहे कीं तुमच्या वडिलांची काय ती स्वतंत्र सोय करा. आमच्या स्वयंपाक घरांत त्यांची बैठक नको. '

दुसरे दिवशीं सकाळपासून धाकटी सून बंगल्याच्या औटहौसमधली खोली साफसूफ करण्यांत गुंतली. खोली स्वच्छ झाडून सारवून ठाकठीक केली. आजोबांची खाट, एक आराम खुर्ची. स्टूल, तांब्याभांडं, तस्त इत्यादि सामान तिथं नेऊन व्यवस्थित लावलं. सर्व कुटुंबाचा एक फोटो–ज्यांत आजोबा मध्यें बसले आहेत–असा भिंतीवर लावला. एक रामपंचायतनाची तसवीर दुसऱ्या भिंतीवर टांगली. आजोबा हें सर्व बघत होते. त्यापासून त्यांना कांहीं बोध झाला होता कीं नाहीं कुणाला ठाऊक ! कारण त्यांचं जेवण झालं तरी हात धुवून पुन्हां ते नेहमींच्याच पाटावर येऊन बसले.

थोरली सून आपलीं ताटं वाढून घेत असताना मध्येंच थांबली.

' ऐकलंत का–तिकडे खोलींत तुमची खाट घालून ठेवली आहे. तिकडे जाऊन विश्रांति घ्या–' इतकं सांगून ती थांबली नाहीं. तिनं आपल्या मुलीला हाक मारली–

' सुशे, आजोबांच्या हाताला धरून त्यांना त्या खोलींत घेऊन जा बाळा–'

आजोबा मुकाट्यानं सुशीबरोबर गेले.

खोलींत त्यांनीं किलकिल्या डोळ्यांनीं चहूंकडे पाहून घेतलं. त्या पांढऱ्या

शुभ्र ऊंच भिंती अंगावर धावून येत आहेत असं त्यांना वाटलं. उगीचच त्यांनीं अंग चोरल्यासारखं केलं आणि खाटेच्या कडेला ते बसून राहिले. बाहेर केळीच्या बेटापाशीं मोलकरीण भांडीं घासत होती त्याचा आवाज त्यांना सहन होईना. ते दोन्ही हातांनीं कान दाबून धरून खिडकींतून बाहेर पहात राहिले.

आतां ते जेवणाखाणापुरतेच घरांत जात आणि तेव्हढं काम होतांच तसेच कांपत कांपत आपल्या खोलींत येत. सकाळीं थोरली नात येऊन खोली स्वच्छ करून जाई. तिच्याशीं त्यांना एका शब्दानं बोलण्याची इच्छा होईना. दुपारी थोरली सून त्यांचं तस्त घेऊन जाण्यासाठीं येई. तिच्याकडे तर ते दृष्टि देखील टाकण्यास तयार नव्हते.

पण त्या खोलीत त्यांना एकटं बसायचं भय वाटे–कुणीच नाहीं सभोंवतीं कसलीच जाग नाहीं. मग ऊन उतरलं कीं ते हळू हळू बागेंतून बाहेरच्या फाटकाशीं जाऊं लागले. तिथं फाटकाला लागूनच लहानसा कट्टा होता त्यावर ते बसूं लागले. पुन्हां त्यांना माणसांत आल्यासारखं वाटायचं. रस्त्या वरची रहदारी दिसायची. किती पाहिली तरी संपायची नाहीं.

रस्त्यानं कुणी मूल जातांना दिसलं कीं त्यांना रहावायचं नाहीं. उपरण्याच्या टोकानं डोळ्याच्या कोरा पुसत ते कांपऱ्या आवाजांत हांक मारीत–

'ए बाळ, इकडे ये'–

पोरगं वाचकतच 'काय' म्हणून जवळ यायचं.

'कुठें निघालास ?'–

मुलानं उत्तर दिलं कीं म्हणायचे–

'जा हं, जपून जा.'

हळू हळू त्यांना ती संवयच लागली. 'ए मुला, इकडे ये'–आणि तो जवळ आला कीं म्हणायचे, 'कांहीं नाहीं, जा. जा. आपल्या कामाला जपून जा.'

थोडे दिवस मुलं त्यांनीं बोलावलं कीं यायचीं पण मग येईनाशीं झालीं. त्यांनीं बोलवावं–

'ए मुला इकडे ये.'

आणि मुलानं सटकून पुढें जावं.

'गाढवा, थांव तूं तुझ्या वापाला सांगतो–' असं मग त्यांनीं मागून ओरडावं, चिडावं. नातवंडांवर एक शब्द टाकतां येत नव्हता. पण रस्त्यावरच्या मुलांना हवं तसं बोलून घ्यावं–

'येत नाहीं म्हणून पुढं जातो शिचा–परत येईल काय या रस्त्यानं–' असं किती वोलत राहावं याला सीमा नाहीं. जाणाऱ्या येणाऱ्यांनीं या संतापणाऱ्या म्हाताऱ्याकडं वळून पहावं–थोडं दवकावं–

पुन्हा आजोवांनीं ओरडावं–

'वघतां काय ? तमाशा आहे ?'

आणि वाजूनं रेंगाळत उभ्या असलेल्या पोरांनीं खो खो हंसावं.

एकदा त्यांच्या शेजारची मुलगी घाईघाईनं चालली होती. आजोवांनीं हाक मारली–

'ए मुली, जरा इकडे ये.'

जाण्याच्या घाईंत तिनं तें ऐकलं नसावं–ती तशीच पुढें गेली.आजोवा मोठ्यांदा ओरडले–

'येतेस कीं नाहीं–चालली वेण्या उडवीत .... नखरा करून रस्त्यांनीं जातां–लाजा वाटत नाहींत तुम्हांला ?'

ती मुलगी परत फिरली आणि तडक आपल्या घरांत शिरली, आणि आपल्या आईला वरोवर घेऊनच वाहेर आली. पदर ओचे खोऊनच ती शेजारीण आजोवांच्या समोर येऊन उभी राहिली. दोन्ही हात नाचवत ती मोटमोठ्यांदा वोलत होती–

'कां रे म्हाताऱ्या. रस्त्यानं जाणाऱ्या पोरींवर काय म्हणून तोंड सोडतोस–घरांत जाऊन वस कीं गप्प. मोठा झालास तर आपल्या घरांत....'

लोकं ऐकायला थांवलीं. दारांत गर्दी जमा झाली. आजोवा भांवावले· उभे राहिले. काय वोलावं त्यांना सुचेना.

थोरली सून वाहेर आली आणि मुकाट्यानं त्यांचा हात गच्च धरून त्यांना त्यांच्या खोलीकडे घेऊन जाऊं लागली.

वकील, डॉक्टर दोघेही घरांत नव्हते. सूनबाई संतापानं शरमेनं तांबडी लाल झाली होती. आपल्या तोंडून वडील माणसांना भलते शब्द बोलून जातील म्हणून तिनं ओठ घट्ट आवळून धरले होते.

आजोबांना खोलींतून आंत आणून तिनं खाटेवर बसवलं. आणि आक्रस्ताळेपणानं त्यांच्या पाया पडत ती बेभानपणानं म्हणाली–'

'पाया पडतें तुमच्या. पण आतां पुन्हां बाहेर जाऊन बसूं नका. झाला तेव्हढा फार्स पुरे झाला. घराची अब्रू घालवूं नका. पाया पडतें तुमच्या–

थरथरत्या आवाजांत असं बोलून ती बाहेर पडली, आणि तिनं दार ओढून घेतलं.

दार बंद होतांना दिसतांच आजोबा भयंकर घाबरले. त्यांना गुदमरल्यासारखं झालं. त्यांनी खसाखसा हातावर हात चोळले. आणि कसा कुणाला ठाऊक, एकदम मोठ्यानं गळा काढला. तशी बंगल्यांतून धाकटी सून धांवतच आली. गडीमाणसं गोळा झालीं. धाकट्या सुनेनं एकदम दार उघडलं तसे आजोबा एकदम गप्प झाले. कावरेबावरे होऊन बघत राहिले.

'वेड्याच्या इस्पितळांत घालावं लागणार कीं काय बाई'–थोरली सून मोठ्यानं कुणाला तरी सांगत होती. ते शब्द त्यांच्या कानावर आले. त्यांचं मन एकदम पेटलं.

'हरामखोर–कुणाला इस्पितळांत पाठवणार आहां? मला–आग लागो तुमच्या तोंडाला'–असं जोरानं–शक्य तितक्या जोरानं ओरडत त्यांनीं दार धाडकन् लावून घेतलं. दोघी सुना दूर झाल्या. बावरून बघतच उभ्या राहिल्या.

बंद दाराच्या आंतून आजोबांचं संतापणं ऐकूं येत होतं. आजोबांनीं तांब्यावरचं फुलपात्र फोटोवर फेकून मारलं असावं–केवढ्यांदा 'खण खळ खळ'–आवाज झाला.

'बाई–आतां हो'–धाकट्या सुनेनं मोठ्या सुनेला मिठीच मारली.

आजोबांनीं भरलेला तांब्या फरशीवर फेकला–

तो आवाज ऐकतांच मोठी सून भानावर आली. धाकट्या सुनेची मिठी सोडवून ती खिडकीकडे गेली–संतापानं ओरडली.

'आतां गप्प बसतां कीं नाहीं–खबरदार फेकाफेकी कराल तर'–

आजोबा एकदम चूप झाले. अंगावर उसळलेलं पाणी उपरण्यानं पुसत ते खाटेच्या कडेला बसून खिडकींतून बाहेर पाहूं लागले. दूर त्यांच्या दोन सुना एकमेकीला बिलगून उभ्या होत्या. शेवटीं त्या हळू हळू बागेंतून बंगल्यांत निघून गेल्या. समोर कुणीच राहिलं नाहीं. तरी आजोबा खिडकींतून बाहेर बघत राहिले. अंधार पडला. कुणीतरी हळूच दार उघडून आंत आलं आणि दिवा लावला. आजोबांनीं बाहेरची नजर आंत वळवली नाहीं. अंधारांतच ते बघत राहिले. ओठ केविलवाणेपणानं हालत होते, आणि नजर भिरभिर फिरत होती.

 

# बरवी, पेंडशी आणि त्यांची पाहुणी– ...६

शहरांतल्या कोणत्याही लहानशा रस्त्याला आडव्या फुटलेल्या अरुंद बोळांपैकींच तो एक बोळ होता. दीड हात रुंदी असेल नसेल. दोन्ही बाजूनं हातभर खोलीचीं गटारं होतीं. दर घराच्या काळ्या तोंडाच्या मोऱ्या त्यांत आपलं सर्वस्व ओकत होत्या. पण त्या गटाराला वहाणं म्हणजे काय हें माहीत नव्हतं. गटारावरच दोन लांबट फरशा किंचित उतरत्या टाकून घरांच्या पायऱ्या बनवल्या होत्या. त्या पायरीला लागून उंबरा आणि लगेच घर. दोन खोल्यांचं प्रत्येकाचं घर. अशाच एका घरांतील गोष्ट.

त्या लहानशा खोलीचे तट्टी लावून दोन भाग केले होते. बाहेरच्या भागांत अगदींच थोडं सामान दिसत होतं. एका कोपऱ्यांत दोन छोट्या ट्रंकांवर कांवळ्याच्या दोन तीन छोट्या वळकट्या रचल्या होत्या. उभ्या आडव्या खुंटींना बांधलेल्या दोरावर पातळ–चोळ्या वाळत पडल्या होत्या. खुंटीवर दोन जुनीं लुगडीं टांगून ठेवलीं होतीं. एकच कोनाडा होता. त्याचा वरचा भाग चिमणीच्या धुरानं काळाकुट्ट होऊन गेला होता. एक छोटीशी फणी-घरची पेटी हीच काय ती त्या कोनाड्यांतील दौलत. भिंतीकडे एक जुनेर कसंतरी पसरून एक प्रौढ बाई हात उशास घेऊन आडवी झाली होती. दुसरी एक तिच्याहून किंचित् तरुण स्त्री भिंतीला टेकून बसून तांब्यावर सूत

कातत होती. कापूस, सरक्या, राख, असलं साहित्य तिच्या पायाशींच पडलं होतं. या सर्व खोलींत लक्ष वेधून घेण्याजोगी एकच जागा होती. ती म्हणजे दारामागची खुंटी. त्या खुंटीवर एक नवंसं छापील पातळ लोंबत होतं, आणि त्याच्यावर एक पांढरा शुभ्र ब्लाऊज पण लटकत होता.

याच खुंटीकडे पहात तांव्याला सुताचे वळसे देत वरवी आश्चर्यानं म्हणाली,

'काय गो ' अजून हॅं आलं नाहीं- सैंपाक तो तीन जणांचा अन् उशीर तर काय–'

' पण तिला काम तरी कुठलं दिलंस तूं ? '

पेंडशी उठून बसली. तिनंही तिरस्कारानं त्या खुंटीकडे नजर फेकली.

' हां तिला गो कुठलं काम मिळणार? आज तीन वार झाले. मी तरी ही धोंड किती वेळ संभाळूं? त्या नेन्यांच्या इथं हवी होती बाई. म्हटलं जा–'

' आआदीं चांगलं ठिकाण दिलंस शोधून, तिचा अवतार बघून कोण गो तीज स्वयंपाकास ठेऊन घेणार? तो भांग काय, न् तें पातळ काय नेसते, आणि त्या पायास क्लिपा गो कशास ? ती देशमुखीण म्हणते कशी, " नको ग बाई, ही बाई आमच्या घरीं– " असंच त्यांचं किती वेळ बोलणं चाललं होतं. जिच्या विषयीं बोलणं चाललं होतं ती त्या खुंटीवरच्या पातळाची मालकीण त्यांच्या घरीं पाहुणी होती.

वर्षापूर्वी भावाच्या बायकोच्या बाळंतपणासाठीं वरवी आपल्या भावाकडं कोंकणांत गेली होती. तिथं बररोज सकाळीं ताक मागण्यासाठीं एक मुलगी येत असे. वीस बावीस वय, पण उफाडयाचा शरीरबांधा. ठसठशीत नाक-डोळे, गव्हासारखा तांबूस वर्ण; कसेतरी विंचरलेले पण भरदार केस–असं तिचं रूप होतं. हातांत एक एक जाडशी विटलेली बांगडी हाच काय तो तिचा अलंकार. उभं लावून घेतलेलं जुनं धोतर आणि विटकी चोळी ही तिची वेषभूषा. पण तरी ती मोहक दिसे. आणि पांढऱ्या फटफटीत कपाळा-मुळें तर त्या मोहकतेला करुणरम्य मादकपणाची झिलई मिळत होती. चेहरा नेहमी कष्टी; कुणाशी बोलत नसे, चालत नसे. ताकाचं भांडं भरून दिलं की त्याच पावली घेऊन परत फिरे.

वरवीनं भावजयीकडून त्या मुलीविषयीं माहिती काढली. शेजारघरची तीं एक दुर्दैवी सासुरवाशीण होती. ज्याच्यावरोबर तिनं अग्निब्राह्मणांच्या साक्षीनं सात पावलं टाकलीं होतीं तो संसारांत पाऊल टाकण्यापूर्वींच तिचा हात सोडून गेला होता. आई होती तोंवर माहेरीं तिचा ठाव लागला होता. पण भावजयीच्या कारकीर्दींत जिथलं माणूस तिथं वरं, या न्यायानं तिला सासरीं येऊन पडावं लागलं होतं. आज पांच वर्षं ती त्या सासऱ्याच्या मोठ्या कुटुंबांत वावरत होती. मोठे दोघं दीर. त्यांचीं बायका मुलं, धाकटे दीर, सासू सासरा, नणंदा या सर्व पसाऱ्यांत एकटी अशी तीच होती. पहाटे पांचपासून शेणगोठा, झाडसारव हें काम तिचं सुरू झालं की रात्रीं अकरा वाजतां स्वयंपाक घरांत पोतेरं घालून नंतर त्या ओल्यांतच आपलं कांवळ पसरून होईपर्यंत तिचं रावणं सुरू असे. जावांची मुलं लहान होतीं. नणंदा माहेरवाशिणी होत्या. सासू म्हातारी होती. तेव्हां घराचा राव उचलायला तिच्या इतकं कोणीच समर्थ नव्हतं. या कष्टांना ती कंटाळून गेली होती. मायेनं बोलणारंही कोणी नव्हतं. सासू तर तिच्याशीं बोलतच नसे. दीर बोलायला येत, तिच्याशीं गोडीनं वागूं पहात. पण मग जावांचा तडफडाट सुरू होई.

'ए रुक्मिणी हें घेऊन जा !' 'ए रुक्मिणी जरा दुधाचा तांब्या आण ! ' अशीं दिरांनीं कामें सांगावीं. ती पुढं गेली कीं मागून शब्द येत :—

'मेलीला सारखं पुरुषांच्या पुढं पुढं करायला हवं—जरा तरी मर्यादा—'

तिला या गोष्टींनीं जिवाचा कंटाळा येऊन गेला होता. रात्रींच्या रात्रीं तिच्या झोपेशिवाय जात. त्या घरांत रहाण्याचा तिला उवग आला होता.

कष्टाला ती कंटाळली होतीच; पण अलीकडे तिला नवीनच एका भीतीनं घेरलं होतं. तिचा थोरला दीर. त्यानं काय मनांत घेतलं कुणाला टाऊक, सारखा तिचा पिच्छा पुरवूं पहात होता. दिवसभर त्याच घरांत राहून त्याला टाळणं तिला मोठं कठीण होऊन वसलं होतं. त्या दिवशीं रात्रीं अकरा वाजतांची गोष्ट. रात्रीचं काम आटोपलं कीं झोपण्यापूर्वीं गोठ्यांत जाऊन वैरण काडी घालण्याचा तिचा ठराविक कार्यक्रम होता. कधीं कधीं या शांत वेळीं ती तास अर्धा तास या मूकप्राण्यांबरोबर घालवी.

सर्व घरांत हेच प्राणी तिला मायेनं वागवीत. ती गोठ्यांत आली कीं, वासरं कान टवकारीत, म्हशी प्रेमानं रेंकूं लागत; आणि गाई तिचं अंग चाटण्या-साठीं दाव्याला हिसके देत. तिनं चार जनावरांपुढं गवत टाकलं असेल नसेल तोंच कुणीतरी तिला हाक मारली.

' रुक्मिणी ! '–

त्या हाकेंतील पुरुषी आर्ततेनं तिचं रक्त सळसळून आलं. अशा तऱ्हेची हाक तिनं कधींच ऐकली नव्हती. कपाळावरील घाम पुसत तिनं मागें वळून पाहिलं. दाराशी तिचा थोरला दीर उभा होता. हातातील भिकार चिमणीच्या लाल प्रकाशांत त्याचं कमरेपासून वरचं उघडं अंग उजळून दिसत होतं. त्याचीं तीं खोल गेलेलीं गालफडं, राकट मिशा, दाट भुवया अन् त्याखालचे आधाशी डोळे– रुक्मिणीचं सळसळून आलेलं रक्त एकदम थंड पडलं. तिच्या अंगावर शहारे आले. म्हशीच्या गोवणींत शिरून सर्व बळ एकवटून ती ओरडली.

'बाई–अहो बाई–'

आपण केव्हां अन् कां ओरडलों हें तिचं तिलाच समजलं नव्हतं. तो दार सोडून बाजूला झाला, तितक्यांत मागचं दार वाजलं आणि कुणीतरी निदसुऱ्या आवाजांत म्हणालं–

' काय गो–ओरडायास काय झालं? वाघान् तूज खाल्ली कां काय ?– आन् त्रिंब्या ऽ–तूं रे कुठें इकडे ? अगो कवटाळणी– माझ्या पोरावर हें कुभांड–तुज वाघानं खाल्ली ?–मेल्या बघतोसरे काय भेकडाप्रमाणं ? घे काठी आणि फोड तिला.-'गोठ्याच्या दाराशीं येऊन सासूबाईंनीं गर्जना केली.

गुराख्याची काठी तिथं खुंटीवरच होती. त्रिंबकरावांनीं ती खसकन ओढली. रुक्मिणीच्या आर्तस्वरानं गोठा भरून गेला. घरांतील मंडळी बाहेर आली. गाई म्हशी दाव्याला हिसके देऊं लागल्या. थोड्या वेळानं सर्व सामसूम झालं आणि ती एकटी मात्र गोठ्याच्या दाराशीं उभी होती. घराचं दार बंद झालं होतं. आंतून कडी लागली होती, तिचा आवाज स्पष्टपणें तिनं ऐकला होता.

रडूनच कीं काय तिचे डोळे कोरडे होऊन गेले. शून्य दृष्टीनं अंधारांत पहात ती उभी होती.

'रुक्मिणी–इकडे ये गो !' बरवी शेजारच्या परसांतून तिला हलकेच बोलावत होती. 'या वईवर चढून ये इकडे- सकाळीं जा म्हण घरांत.' आजपर्यंत सांठवून ठेवलेल्या दुःखाला तिनं बरवीच्या जवळ वाट करून दिली. तिच्या कुशींत मस्तक खुपसून किती तरी वेळ ती रडत होती, बोलत होती–रागावत होती, हुंदके देत होती !

तिची हकीकत ऐकून बरवीला भडभडून आलं. तिच्या मस्तकावरून हात फिरवीत ती म्हणाली.

'बाई, आपलं स्वतःचं माणूस नाहीं म्हणजे बाईमाणसांच्या जल्माची हीच परवड. मी सुद्धां अशाच प्रसंगांतून बाहेर पडलें आहे बरं. मला सर्व कांहीं माहीत आहे. म्हणूनच तुला सांगतें. तूं इथून या नरकांतून नीघ. शहरांत चल. दोन कामं करावी अन् खुशाल उशाला हात घ्यावा.'–

बरवी कितीतरी वेळ बोलत होती. आणि रुक्मिणी डोळे विस्फारून ऐकत होती. पहाटेचा कोंबडा आरवतांच ती मुकाटयानं गोठयांत आली. तिची नित्य कर्माची कामं सुरू झाली. सबंध घरांत तिच्याशीं कुणी बोलत नव्हतं. तिनंही मनाशी कांहीं ठरवलं होतं. जणूं कांहीं कांहीं घडलं नाहीं अशाच तऱ्हेनं ती वागत होती. सर्वांचीं जेवणं झाल्यावर आपल्या आपण वाढून घेत होती. कोणाशी एक शब्द बोलत नव्हती.

एका ठराविक दिवसाची ती वाट पहात होती. त्या दिवसाची पहाट उजाडतांच ती हळूच अंथरूणावरून उठली. लाथेनं तिनं तें कांबळं दूर फेकलं. बोचक्यांत बांधून ठेवलेलं भावजयीनं दिलेलं पातळ, झंपर काखेंत घेतलं आणि ती बरवीच्या परसांतून बाहेर पडली.

'रुक्मिणी कुठं ? ' म्हणून जेव्हां घरांत चौकशी सुरू झाली, त्या वेळीं त्या गांवावरून जाणारी बसगाडी तिला घेऊन तीस चाळीस मैलांवर गेली होती.

निर्वेधपणें आयुष्य घालविण्यासाठीं रुक्मिणी शहरांत आली. बरवी हाच तिचा आधार होता. बरवी व पेंडशी दोघी मिळून एका खोलींत रहात असत. रुक्मिणीनं दोन दिवस पाहिलं. किती सुखाचं होतं दोघींचं जीवन. सकाळीं

बाहेर पडायच्या त्या ढेकरा देत दुपारीं लोळायला खोलींत यायच्या. संध्या काळीं चहा फराळ आटपून पुन: कामाला गेल्या कीं रात्रीं नऊला घरीं हजर. दोघींच्या ज्या आपापल्या घरच्या मालकिणीसंबंधी वगैरे गोष्टी चालत त्या तर तिला किती गमतीच्या वाटत.

बरवी सांगे 'आज सकाळीं मीं गेलें. घरांत तर भाजी कांहीं चिरलेली नव्हती. माझं अडलांय चिरून घ्यायचं. आबासाहेब पाटावर बसले. खा म्हटलं वरण न् भात—त्यांनीं माझ्यावर हे डोळे केले. म्हणतात कसे—'बाई, आज भाजी कां नाहीं केली? ' मी डरणार त्यांना—मी म्हटलं—'तुमच्या बाईसाहेबांना विचारा. त्यांनीं जें पुढ्यांत ठेवलं तें शिजवलं. गप बसले— बोलणार काय पुढें! "

स्वयंपाकीण बाईला असं वर्चस्व गाजवतां येतं तर—रुक्मिणीनं मोठ्या अभिमानानं बरवीकडे पाहिलं.

'तुझी गोष्ट वेगळी बाई—' रुक्मिणीकडे पहात पेंडशीनं डोळे चिमकावले. 'तुला काय तुझ्या मालकिणीची काढून टाकायची ताप नाहीं—' अस म्हणत ती खो खो हसूं लागली.

त्यांच्या भाषणाचा संदर्भ न कळल्यानं रुक्मिणी उगी राहिली.

रुक्मिणी चार दिवस त्यांच्या घरीं राहिली; त्यांच्याबरोबर हिंडली फिरली; आणि शहराची राहणी तिनं चटकन उचलली. तिचा भांग आतां सरळ निघूं लागला. अंबाड्याला सैलपणा आला. बाहेर जातांना ती बरवी- कडून मागून घेऊन पायाला क्लिपा लावूं लागली.

तिच्याकडे बोट दाखवून 'हिला काम हवय हो' असं बरवी कुणाला सांगूं लागली कीं, ऐकणारी व्यक्ति एकदम डोळे विस्फारून तिच्याकडे पाही. असं असं ! मला वाटलं ही तुमच्या मालकांपैकीं कुणी असेल'—असं म्हणत रुक्मिणीकडे टक लावून पाही. खरंच रुक्मिणी आतां थोरामोठ्या घरची दिसत होती.

पेंडशी तिला म्हणे— 'रुक्मिणी, तुला काम मिळणं जड आहे बाई—'

'कां हो? मी चांगलां स्वयंपाक करीन. मी चुकारपणा करणार नाहीं.'

'वेडी गो वेडी—नक्षत्रासारखं रूप तुझं—कुठली मालकीण आपल्या घरांत थारा देणार तूज—'

रुक्मिणी ओशाळली. 'इथंही या भानगडी आहेतच तर!' तिच्या मनानं कच खाल्ली.

पेंडशीचं आणि बरवीचं सरळ नसावं फारसं. बरवी नसली कीं, पेंडशी बरवीच्या किती तरी गोष्टी रुक्मिणीला सांगे.

आजपर्यंत बरवीनं किती ठिकाणीं काम केलं–तिथून तिथून ती कोणत्या कारणानं निघाली, आबासाहेबांच्या घरीं तिचं वर्चस्व राहायला कारण काय, दहा रुपये पगारांत इतकीं तरतऱ्हेचीं झंपरं, पातळं ती कशी घेऊं शकते, वस्तु हाताळण्याची तिला कशी खोड आहे, बरवीची एकही गोष्ट पेंडशीनं राखून ठेवली नाहीं.

बरवी कामावरून आली कीं लगोलग कपाट उघडून काय करते, हें आतां रुक्मिणीच्या लक्षांत आलं. बरवीच्या कपाटांत तूप, वेलदोडे, रवा, साखर यांनीं छोटचा मोठचा बरण्या नेहमी तुडुंब भरलेल्या असत. ओच्यांतील वस्तु कपाटांत दडपली कीं मग ती बाहेर येई, हें त्या आठ दिवसांत रुक्मिणीनं दोन तीनदां पाहिलं होतं, बरवीनं मालकाला आपल्या नादीं लावलं होतं. रुक्मिणीच्या समोर चटकन आपला थोरला दीर आला, तो दीर–हे आबासाहेब. ही चोरटी बरवी–छी!

आतांशा ती बरवीपेक्षां पेंडशीबरोबरच अधिक राहूं लागली. पेंडशी अगदीं कुरूप होती. नवऱ्यानं तिला सोडून दिल्यानं तिच्यावर या कामाची पाळी आली होती. ती भरड सुताडें नेसे; कामाच्या घरांत कंबर मोडेपर्यंत राबे. वर्षाकाठीं मालकीण दोन जुनेरं देई तेवढचावरच खूप होई. महिन्या-काठीं मिळणारा पगार गांवीं आपल्या मुलाला पाठवी. तिचा मुलगा कुणा-कडे आश्रित राहून विद्या करीत होता. त्याच्या कपडचालत्त्याला फी–पुस्त-काला तिचा पगार जाई.

एकदाचं रुक्मिणीला काम मिळालं. बरवीनं तिला नेने वकीलांचं घर दाखवून दिलं. बरवी प्रथम कामाला लागली ती त्यांच्याच घरीं. पण तेथून ती एकाएकी निघाली, आणि तेव्हांपासून नेन्यांना स्वयंपाकीण मिळणं कठीण होऊन गेलं होतं. आज सात वर्षं बायको दम्यानं आजारी असल्यानं त्यांना बाईची जरूरी असे, पण मिळत नव्हती.

रुक्मिणीला त्या घरांतील काम आवडलं, पांच सहा जणांचा स्वयंपाक–पाणी झरझर उरकावं. जेवण झाल्यावर मालकिणीच्या अंथरुणाशीं थोडा वेळ बसावं. तिला कांहीं हवं नको बघावं व खोलीवर यावं. असा तिचा क्रम होता.

दररोज तिच्या येणाच्या वाटेवर बरवी टपून बसलेली असे. रुक्मिणीनं उंबऱ्यांत पाऊल टाकलं कीं बरवी अधीरपणानं विचारी––

'काय गो, आज तो नेन्या कांहीं बोलला काय तुझ्याशीं–जरा जपून गो बाई–मला अनुभव आहे म्हणून म्हणते.'

'नाहीं हो मावशी, एवढं सुद्धां ते बोलत नाहींत माझ्याशीं,' तिचं असं नकारार्थी उत्तर आलं कीं बरवीचा चेहरा पड. पण तिच्या मनाचं समाधान होण्याला फारसे दिवस लागले नाहींत.

एक दिवस रुक्मिणी दुपारीं कितीतरी उशीरा आली. बरवी तिची वाट पाहून झोपली होती. पेंडशी तांब्यावर सूत कातीत बसली होती. रुक्मिणी आली तो नेहमीप्रमाणें गप्पांत सामील झाली नाहीं. कोपऱ्यांतील ट्रंकेला टेकून स्वस्थ बसून राहिली. आज तिच्या मस्तकांत निराळंच विचारचक्र सुरू झालं होतं.

त्या दिवशी सुटी असल्यानं वकीलसाहेब घरींच होते. दुपारीं सुखाचं जेवण झाल्यावर सुपारी तोंडांत टाकीत ते पत्नीच्या खोलींत गेले. आराम-खुर्चीवर पडून गप्पा मारण्यांत ते गुंतले. इतक्यांत रुक्मिणीनं हळूंच खोलींत डोकावून पाहिलं.

'या ना बाई या' मालकीण हळूंच म्हणाली. संकोचानंच रुक्मिणी आंत शिरली.

नवरा बायकोनीं मिळून हळू हळू रुक्मिणीची हकीगत ऐकून घेतली. मग नेने तिला म्हणाले होते.

'बाई मी तुम्हांला एक मार्ग सुचवूं का. तुम्ही हा धंदा सोडून द्या. तुमच्या-सारख्यानं करण्याचीं हीं कामं नव्हेत. हें तुमचं घर समजा. आणि आमच्या घरीं रहा. मी तुमची कशी काय व्यवस्था करावी तें पाहतों. बघा विचार करा.

'मी आतां जातों ग' असं पत्नीला सांगून ते उठून बाहेर गेले.

ते जातांच त्यांची पत्नी रुक्मिणीला म्हणाली.

'यांचा स्वभाव बघा भारी हा. सर्वांचं कल्याण करायची यांना फार हौस हो. पण नेहमींच कांहीं सगळी याचा चांगला अर्थ घेत नाहींत. मात्र ती तुमची मावशी म्हणता ती बरवीण बाई; अशीच आमच्या घरीं कामाला होती. चांगली तरणी ताठी बाई. आपल्या हातून कांहीं चांगलं झालं तर करावं म्हणून हे तिला असंच सांगायला गेले. आणि तिनं गांवभर यांच्या विषयीं वाटेल तें उठवलं हो. आणि एक विद्यार्थी यांनीं शिक्षणासाठीं जवळ केला तर तो आपला चोरी करूनच पळाला.

'बाईसाहेब, पण असा चांगला मार्ग दाखवणारे फार थोडे—'

'तुह्मी यांचं ऐकून पहा. यांच्यावर विश्वास ठेवा. तुमचं चांगलं होईल.' बाई श्रमानं आडव्या होत म्हणाल्या.

रुक्मिणीनं येतांक्षणीं बरवीला हें बोलणं सांगितलं. बरवी ताडकन् उभी राहिली. 'अरे नेन्या, ही पोरगी तूज घरांत हवी नाहीं--अरे मांगा—'

'अगो, तूं कां अशी तापतेस?' पेंडशी ओरडली.

'मज हें सहन होत नाहीं—'

'मावशी तूं गप बस. मला माझा विचार करूं दे.' रुक्मिणी पटकन बोलली. 'हें सहन होत नाहीं. आणि आपण वाटेल तसं वागलं तर चालत.' आंत जातां जातां ती पुटपुटली.

दुसरे दिवशीं ती कामावर गेली ती कांहीं निश्चय करूनच.

त्या दिवशीं जेवून उठतेवेळीं नेने म्हणाले—

'काय ठरला विचार तुमचा. संकोच नका करूं. अगदीं माहेरवाशिणी-सारख्या मोकळेपणानं रहा घरांत. माझ्या वायकोला फार आनंद होईल. मुलं तर 'बाई बाई' म्हणून तुम्हांला चिकटलीं आहेतच—हं. आतां जाऊंच नका खोलीवर, समजलं.'

रुक्मिणी घरीं आली नाहीं.

त्या दिवशीं बरवी पेंडशी वाट पाहून थकल्या.

गांवांत कुजबूज झाली. नेने वकीलांनीं लग्नाचा विचार केलेला दिसतोय.

रुक्मिणीला मात्र गांवांतील गप्पांची कांहींच कल्पना नव्हती. ती घराबाहेर

पडतच नव्हती. किती वर्षांनीं तिला आपलेपणानं वागवणारीं माणसं मिळालीं होती. त्यांच्या उस्तवारींत ती सारा दिवस गर्क होऊन जात होती. आपलं आतां पुढें काय हाही विचार कधीं तिला शिवला नाहीं.

तिला आपल्या पुढचा मार्ग दिसला तो भाऊबीजेच्या दिवशीं. आणि तोही किती गमतीदार रीतीनं.

त्या दिवशीं नेने कसलं पार्सल घेऊन घरांत आले तों रुक्मिणी मुलांना ओवाळणीची तयारी करून देत होती.

'बाई, ही घ्या माझी तुम्हांला ओवाळणी.' नेन्यांनीं पार्सल बाईच्या स्वाधीन केलं.

रुक्मिणी अधीरपणानं मालकिणीच्या खोलींत गेली.

'मला कशाला काय आणखी?' संकोचून म्हणाली.

'तुम्हालाच तर–पहा तर शोधून'

रुक्मिणीनं कापऱ्या हातानं पार्सल सोडलं.

तें एक छायाचित्र होतं. एक उंचा पुरा देखणा पुरुष रुक्मिणीकडे पाहून. मंदस्मित करीत होता. ती एकदम दचकली. फोटो तिच्या हातून खालीं पडला. 'म्हणजे याचा अर्थ काय?' गोंधळल्याप्रमाणें तिनं मालकीणीला विचारलं

'हा कनी माझा मावसभाऊ आहे. याला तुम्ही पसंत आहा. आणि आम्ही तुम्हांला याच्या स्वाधीन करणार आहों. उद्यां येणार आहे तो. त्याचा निश्चय होता, लग्न केलं तर अशाच मुलीशीं करीन म्हणून. समजला का याचा अर्थ?' खटचाळपणें हंसत मालकीणबाई म्हणाल्या.

'आमची ओवाळणी पसंत ना!' नेने मागे उभे राहून विचारत होते.

रुक्मिणी बावरून गेली. तें छायाचित्र तिच्या पायाशीं पडलं होतं, तिनं खालीं पाहिलं. तेथूनही तो देखणा पुरूष तिच्याकडे पहात होता.

सर्व कांहीं तिथेंच टाकून ती घरांत पळून गेली.

● ●

## बाहुला ...७

मुलगी पाहण्यासाठीं आलेली मंडळी दाराबाहेर पडली. भाऊही कपडे करून त्यांच्या बरोबर गेले. फाटकांतून सगळीं जणं बाहेर पडून जातांच वैनी म्हणाल्या:

'वन्सं, आतां कपबशा आवरा बाई तुम्ही. मी जरा पडते.'

चहा फराळाचं करून खरंच वैनी फार दमल्या होत्या. जिना चढून वैनी वर जातांच, कुसूम बैठकीच्या खोलीच्या दाराशीं येऊन उभी राहिली. नवरा मुलगा जिथं बसला होता त्या जागेकडे तिनं लाजतच पाहिलं. तिला खुदकन हसू आलं—

'तूं मेरा चांद मैं तेरी चांदनीऽ, तिनं एक लकेर घेतली. पुढच्या आला-पाच्या वेळीं मान वेळावली, आणि तेंच पद गुणगुणत कपबशा गोळा करून ती न्हाणीघरांत गेली. पुन: तिचं तिलाच काय वाटलं कुणाला ठाऊक, ती मधल्या हॉलमधील आरशाच्या कपाटासमोर येऊन उभी राहिली. आपल्या प्रतिबिंबाकडे पहात तिनं हनुवटी वर उचलली आणि मनाशीं म्हटलं, मी पसंत पडणार नाहीं असं कधीं झालंय! शक्यच नाहीं. आपल्या उंच उभ्या प्रतिबिंबाकडे ती पहात राहिली.

तिचा वर्ण उजळ होता. डोळे किंचित बारीक होते, नाक थोडंसं अपुरं

होतं. तिचा बांधा मुळगांवकरांच्या चित्रांतील स्त्रीसारखा होता; आणि दलालांच्या चित्रांतील स्त्रीसारखी तिची वेषभूषा होती. पुढून फुगीर असे केस वळवून तिनं मानेवर लांबट अंबाडा बांधला होता; आणि कानाशीं गुजगोष्टी करणारीं दोन फुलं त्यांत खोचलीं होती. लिंबू रंगाचं पातळ ती अगदीं लपेटून नेसली होती, आणि शालीनतेला थोडे डोळे मिचकावीत तिनं पदर बसवला होता. जरा लांब बाह्याची खोल गळयाची किरमिजी चोळी तिनं अंगांत घातली होती, आणि नखं मेंदीनं रंगवलीं होतीं.

समाधानाचा सुस्कारा सोडून ती आरशावर जरा रेलून उभी राहिली; किलकिले डोळे करून पुन: सारी चित्रं तिनं डोळयासमोर आणलीं.

लग्नाची खटपट करण्यासाठीं तिच्या वडिलांनीं तिला पंधरा दिवसांपूर्वीच इथं पाठवून दिलं होतं. तिच्या भावानंही तिच्यासाठीं स्थळं पहाण्याचं मनावर घेतलं होतं. कालच तो तिला म्हणाला होता.

'कुसमे' तुला मोटारींतून हिंडवणारा नवरा शोधला आहे मी. चिक्कार पैसा, बंगला––आणि पुढच्या वर्षी तो डॉक्टर होणार आहे–आहेस कुठं! –'

आणि आज आतांच तो डॉक्टर आपल्या दोन मित्रांसह तिला पाहायला आला होता. अतिशय उंची कापडाचा राखी रंगाचा सूट त्याच्या गौरवर्णाला खुलून दिसत होता. आपल्या कुरळया केसांचा त्यानं मधोमध भांग पाडला होता. आपल्या केसांचं त्यानं शीड उभारलं नव्हतं हें पाहून कुसूमला एकदम समाधान वाटलं होतं. सोनेरी चौकटीचा निळा चष्मा त्यानं आपल्या डोळयांवर चढवला होता. थोडसं न्याहाळतांच दिसणारे निळया काचेपलीकडील त्याचे भरीव डोळे तिला पुन: पुन: पहावेसे वाटत होते. ती त्याच्या समोरच्याच खुर्चीवर बसली होती. त्याचे मित्र तिच्याशीं बोलत होते. सिनेमाचीं बोलणीं निघालीं होतीं. त्यानं एकच प्रश्न तिला विचारला होता.

'त्या नटीचं काम तुम्ही पाहिलं आहे?'

तिनं 'नाहीं' असं उत्तर देतांच तो म्हणाला होता–'आतां सुरू आहे तो

चित्रपट जरूर पाहण्यासारखा आहे' मग तो तिच्याशीं न बोलतां भाऊशींच बोलत होता. ती ऐकत होती--

आणि ती नटी हो-ती- अलीकडे वघवत नाहीं पडद्यावर, काय खप्पड दिसते.'

त्यांचीं बोलणीं चालल्यावर कुसुम आंत निघून जाण्यासाठीं चुळबूळ करूं लागली; ती लक्षांत घेऊन भाऊ म्हणाले होते,

'डॉक्टर, आणि काय विचारायचं आहे तुम्हाला?'

डॉक्टरनीं एकदम गोंधळल्यासारखा चेहरा करून म्हटलं होतं.

'छे छे. कांहीं नाहीं. जाऊ द्या त्यांना.'

ती आंत आली तेव्हां मन समाधानानं तिचं भरून आलं होतं. चहा झाल्यावर ती मंडळी निघाली; कुंपणापलीकडं ठेवलेल्या निळ्या गर्द मोटारीचा सुरू झाल्याचा आवाज तिच्या कानीं आला. ती आपल्याच तंद्रींत होती. इतक्यांत वहिनी म्हणाल्या होत्या--

'वन्स' आतां कपबशा आवरा बाई.'

पण कपबशा विसळण्याकडेही तिचं लक्ष लागत नव्हतं. त्या मोरींतच टाकून ती आरशासमोर रेलून उभी होती. सोनेरी चौकटीचा निळा चष्मा घालणारा कुरळ्या केसांचा तो तरुण तिच्या डोळ्यासमोर दिसत होता. नव्या बाहुलीला धरून लहान मुलगी जशी सारखी तिला पहात राहते तशी ती सारखो सारखी त्याच्याकडे पहात राहिली होती.

दाराशीं कुणाची चाहुल लागतांच ती भानावर आली. मनांतील बाहुला तिनं झटकन लपवला आणि उत्कठेनं ती दाराशीं धावली.

'काय रे म्हणाले ते' असे शब्द भाऊला विचारण्यासाठीं तिच्या ओठावर आले. पण असं कधीं कोण विचारतं काय? ती न्हाणीकडे वळली आणि कपबशा विसळूं लागली. भाऊची चाहूल लागतांच वरून वहिनींनीं विचारलं--

'काय म्हणते स्वारी'-

जिना चढत भाऊनं सांगितलं--

'उद्यां संध्याकाळीं कळवतो, म्हणालेत.–'

तिनं हातांतील तांब्या भसकन् मोरींत ओतला.

'हें काय? उद्यां संध्याकाळींच कां– आतांच कां नाहीं– दुसऱ्याच्या मनाला ताण तरी किती द्यावा माणसानं' ती मनाशींच चिडली. भाऊवर चिडली. भाऊनं आतांच सांगा म्हणून हट्ट धरायला नको होता काय––त्या निळ्या चष्म्याच्या मालकावरहि चिडली. उद्यां संध्याकाळीं सात–आठ वाजेपर्यंत त्यानं तिला वाट पहायला लावलं होतं.

दुसरे दिवशीं भाऊची कोर्टांतून येण्याची वेळ होतांच, आपली उत्सुकता कुणाला दिसूं नये म्हणून ती आंतल्या हॉलमधें लोकरीचं विणकाम करीत बसून राहिली. बाहेर तो आल्याची चाहूल लागतांच तिचे हात एकदम गार गार झाल्यासारखे तिला वाटले, आणि हातांतील सुया तिनं खालीं टाकल्या.

आतां भाऊ आंत येणार आणि आपले दंड हलवीत आपल्याला म्हणणार–––

'कुस्मे' तुला इतका फक्कड नवरा शोधून दिल्याबद्दल मला काय बक्षिस देणार बोल'––

पण तिला जें ऐकूं आलं तें किती वेगळं! बाहेर भाऊ वैनीला सांगत होता–

'आपली कुस्मी नाहीं पसंत पडली त्याला.'

'कां–?' वैनीनीं जरा रुष्ट स्वरानं विचारलं–

'मुलगी लठ्ठ आहे. त्याला लहानसुरी हवी आहे म्हणे'––

'गेला उडत'– म्हणत वैनी चहाच्या तयारीला लागल्या.

चहा तयार करून वैनी हॉलमधे आल्या आणि म्हणाल्या–

'वन्स' अंधारांतच काय बसलात? बटण नाहीं ओढायचं? आणि सगळे चुकीचे टाके घालून ठेवतां आहां–बघा तरी' –जेवते वेळीं भाऊ चेष्टेनं म्हणाला,

'कुस्मे, आतां जरा डायेटवर रहा'–

'हें हो काय बोलता'– कुसूमची मनस्थिति वैनीनीं ओळखली असावी. 'त्या काय लठ्ठ आहेत? सुखाचं अंग आहे– असायलाच हवं'–

अपमानानं कुसूमच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलं.

आजवर तिला कुणी लठ्ठ म्हटलं नव्हतं. आमची कुस्मी उफाड्याची आहे म्हणून आईनं तिचं वारंवार कौतुक केलं होतं. कुसूम बाहेरून फिरून आली म्हणजे शेजारणी तिच्या आईला म्हणत, 'कुसूमच्या आई, बघतां बघतां केवढी मोठी दिसायला लागली ही पोरगी– दृष्ट काढा तिची' आणि अतां तो कुठला कोण तरुण म्हणत होता 'मुलगी लठ्ठ आहे' आणि असं म्हणत असतांना तो फिदीफिदी हसलाहि असला पाहिजे असं कांहीं तिच्या मनांत आलं आणि तिला हुंदका आवरेना.

भाऊनं पानावरून उठून तिला घेतलं.

'कुस्मे हें काय वेड्यासारखं. केलं नापसंत तर केलं– एवढं काय त्यांत'–

मग जेवण झाल्यावर विषयपालट म्हणून वैनींनीं सिनेमाला जाण्याचा बेत केला. कुसूम हिरमुसल्या मनानं चित्रपट पहात होती. उताणथाटपणानं अंगाला लचके नि पीळ देत नटीचं नृत्य चाललं होतं. आपलं खोटं नाटं शरीरसौष्ठव लोकांच्या नजरेंत भरावं म्हणून नायिका झाडाला रेलून ऊर भरून प्रणयाचे उसासे टाकीत होती. मऊ गवतावर आडवी होत होती. चित्रपट संपून थिएटरमधे चक्क प्रकाश पडला तेव्हां चटकन् कुसूमनं आपले डोळे पुसले.

'खोटं, सगळं कांहीं खोटं' असं ओठ चावीत मनाशीं पुटपुटून ती वैनीच्या मागून आली.

दुसरे दिवसापासून वैनींना वाटलं खरोखरच आपल्या नणंदेनं जेवण कमी केलं आहे. ती नको म्हणाली तरी त्या आग्रह करकरून तिला जेऊं घालूं लागल्या. आणि तिला सांगूं लागल्या––

'वन्स' तुम्ही एकदांच दाखवलं आणि पसंत पडला नाहींत म्हणून इतकं मनाला लावून घेऊं नये. मला किती ठिकाणीं दाखवलं–तुमच्या भावानं देखील मला पहिल्यांदा नापास केलं होतं–आहे माहीत! '––

'मीं कुठं मनाला लावून घेते आहे! उगीचच तुमची समजूत'–– असं

म्हणून कुसूम विषय बदलत होती. फावल्या वेळांत मनाच्या कप्यांत लपवलेल्या कुरळ्या केसांचा भांग पाडणारा आणि निळा चष्मा लावणारा बाहुला बाहेर काढून खेळत बसत होती.

'मी जरा बारीक असते तर यांना पसंत पडले असते. मग संध्याकाळीं मोटर घेऊन भाऊकडे आले असते---आणि म्हणाले असते---

'भाऊसाहेब, तुमच्या बहिणीला जरा माझ्याबरोबर पाठवा---- साड्या पसंत करायच्या आहेत---दागिन्यांचे नमुने निवडायचे आहेत. आणि मग मी त्यांच्या शेजारीं मोटरमधें चढूं लागले कीं वैनी म्हणाल्या असत्या---

'डॉक्टर' आमच्या वन्सना सांभाळून न्या बरं का'---

आणि एके दिवशीं भाऊनं कुसूमला एका काळमावळ्या, गरिबींतून वर आलेल्या अिंजिनीअरची माहिती देऊन म्हटलं--

' आज सहा वाजतां आपल्याला जायचं आहे त्यांच्या घरीं. तयार रहा'

त्या दिवशीसारखीच कुसूम पुन: नटली आणि भावजयीबरोबर निघाली. एका बंगल्याच्या दाराशीं टांगा थांबतांच, दाराशीं उभी असलेली नवे कपडे घातलेली एक मुलगी ' अय्या '--करीत पळाली आणि आंतून एक वयस्क गृहस्थ बाहेर आले.

कुसूम प्रथम कांहीं वेळ आंत वैनीबरोबर बायकांच्या घोळक्यांत बसली. सात आठ बायका जमल्या होत्या. त्यांतील घरची मालकीण शोधून काढायला कुसूमला प्रयास पडला नाहीं. एक उंच चपट्या बांध्याची स्त्री पदर खोचून उभी होती. आणि आंत कुणाला हाक मारून चहा तयार करण्याचा हुकूम सोडत होती.

बाहेर नवरा मुलगा आणि तो वयस्कर गृहस्थ एवढे दोघेच होते. गालिच्यावर बसतां बसतां कुसूमनं त्या काळ्यासांवळ्या इंजिनियरकडे पाहून घेतलं. ' इश्श ! हा नाहीं बाई बरा '--असं नाक मुरडणाऱ्या मनाला तिनं एक चापटी लगावली आणि विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरं देण्याची तिनं तयारी केली.

तो काळासावळा इंजिनियर रोखठोकपणें विचारत होता--

'आपण मॅट्रिक नाहीं झाला तर '--

'नाहीं'–

'कोणत्या सालीं शाळा सोडली ?'

मुलींना कोणतीहि गोष्ट सनांत विचारूं नये हें त्या इंजिनीअरला माहीत नसावं.

आतां सन कोणता सांगायचा बाई !– कुसूम घाबरली.

' झाली चार पांच वर्ष, तिनं भीत भीत सांगितलं.

'अस्सं'–

चहापाणी झाल्यावर कुसूम निघाली. चपला घालण्यासाठीं ती दारांत उभी होती तों आंत कुणी बाई फिसफिसली–

'अिश्श! ही का मुलगी–मुलगी कसली–दोन मुलांची आईच आहे कीं!'

त्या चपटया बांध्याच्या स्त्रीचा तो आवाज कुसूमनं ओळखला. तिनं एक आंवढा घोटला. आणि वैनीनीं एक जळजळीत कटाक्ष आंत फेकला.

'आम्हांला मुळींच या घरांत मुलगी द्यायची नाहीं.' वैनींनीं टांग्यांत चढता चढतांच मोठ्यानं निश्चय बोलून दाखवला.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्या वयस्क गृहस्थांनीं भाऊला घरीं येऊन सांगितलं.

'मुलगा म्हणतो– मुलगी लठ्ठ आहे, तेव्हां आमचा नाइलाज आहे.'

'कुसूमच्या घशांत पुन: कोंडल्यासारखं झालं. ती तटकन् आंतल्या खोलींत जाऊन मुसमुसत पलंगावर पडली.

'मी लठ्ठ आहे–खरंच का मी लठ्ठ आहे–खरंच का मी लठ्ठ आहे ?' तिन त्वेषानं उशीवरून मान वर उचलली. वाचायला घेतलेला अंक वैनींनीं उशागतींच टाकला होता. त्याच्या मुखपृष्ठावरील रमणी मस्तकामागें हात घेऊन झाडाला टेकून बसली होती. तिच्या अंगाचा तो गोलदार लुसलुशीत घाट– कुसूमनं ओठ चावला आणि तें चित्र बोटांनीं कुस्करून चोळामोळा केलं.

वैनी तिची समजूत घालीत–

'वन्सं, त्यांनीं जरी तुम्हांला पसंत केलं असतं तरी त्या घरीं मी तुम्हाला मुळींच देणार नव्हतें.'–

कुसूम नुसतं हूं म्हणायची आणि फावल्या वेळांत त्या काळचासावळचा रोखठोक प्रश्न विचारणाऱ्या वाहुल्याशीं खेळत बसायची–

मी जर बारीक असते, तर त्यांना नक्की पसंत पडलें असतें. काय बाई, त्यांचा स्वभाव! लग्न झाल्यावर, त्यांनीं माझ्या हातांत मोजून पैसे दिले असते आणि रोज संध्याकाळीं ऑफिसांतून आले कीं म्हणाले असते-

'हं–मग काय काय खर्च केला आज! ठेवला का लिहून? दाख व पाहूं'–

मी काय जमाखर्च लिहिणार–मी म्हटलं असतं–'मला नाहीं बाई जमत लिहायला, आणि आवडत पण नाहीं'–आणि मग बाई स्वारी अशी चिडली असती–

असा तिचा त्या वाहुल्यांशीं खेळ चालत असे. इतक्यांत तिच्या वडिलांच पत्र आलं. 'चि. कुसूमचं अद्याप कुठें जमत नसल्यास तिला इकडे पाठवून द्यावें.'

ज्या दिवशीं कुसूम निघायची त्या दिवशीं वैनी तीनतीनदां म्हणाल्या–'वन्स आल्यासारखं तुमचं जमलं असतं म्हणजे बरं झालं असतं.'

आपली बॅग भरतां भरतां कुसूम मनाशीं विचार करत होती.

'आतां पुढचा लग्नाचा सीझन येईपर्यंत आपल्याला खूप बारीक झालं पाहिजे. घरीं गेल्यावर खूप काम करायचं–एक वेळ जेवायचं नाहीं–आणि सारखं झुरत राहयचं–इश्श पण कुणासाठीं झुरायचं?' हा विचार मनांत येतांच तिला खुदकन हसूं आलं. तिनं तो कुरळचा केसांचा मधोमध भांग पाडणारा नि सोनेरी चौकटीच्या निळचा काचेचा चष्मा लावणारा बाहुला बॅगमधें दडपला आणि बॅगचं चापाचं कुलूप चपकन् बसवलं.

● ●

# पालखीचा प्रसाद ! ...८

‘ऐका व ऐका ऽऽऽ आज रात्रीं भजनाच्या वेळीं जानबा पाटलाची नवसाची पालखी फिरायची हाय. तवां समद्यांनीं देवळांत जमावं होऽऽऽ’

तिन्ही सांजच्या सुमाराला प्रत्येक गल्लीच्या टोकाला उभं राहून सात्या तराळानं साधवायला सुरवात केली.

भर उन्हाळ्यांतील ती संध्याकाळ असल्यानं गांवांत अगदीं शुकशुकाट होता. ओल्या गवतावर पोसलेलीं गुरं मस्ती करत वेशींतून शिरत नव्हती कीं, शेतांत खपून घरीं येणाऱ्या शेतकऱ्यांची गर्दी नव्हती. बहुतेक घरांतील कर्ते पुरुष गाडी बैलांसह भाडं धरून परमुलुखाला गेले होते. गुरं अजून डोंगरांतच रेंगाळत होतीं. मोलमजुरीसाठीं जवळच्या निपाणी शहरांत गेलेलीं माणसं अजून परत येण्याला अवकाश होता. तरण्याताठ्या सासुर-वाशिणी, म्हातारी माणसं आणि लहान पोरंबाळं यांचीच काय ती जाग.

पण वरील साधवणं ऐकतांच गल्लीगल्लींतून गजबज सुरू झाली. हातांतलं काम टाकून बायका गल्लींत उभ्या राहल्या. ‘काय गा ? काय साधवतोया ?’ करीत म्हातारे काठी टेकीत अन् अंगावरची कांबळी सावरीत बाहेर आले.

‘आई चल देवळांत जाऊ वा’ म्हणून पोरांनीं आपल्या आयांच्या भोंवतीं गिल्ला सुरू केला. आणि ही जी गडबड सुरू राहिली ती अगदीं भजन सुरू होईपर्यंत.

गांवच्या वेशींत शिरतांच देवीचं दर्शन होईल अशा रीतीनं देऊळ बांधलेलं होतं. मंगलोरी कौलं असलेलीं आणि जमिनीवजा फरशी असलेली अशी ही गांवांतील एकच इमारत. दिवसा या इमारतींत शाळा भरत असे. इमारतीच्या चारी बाजूंनीं जे सोपे उतरले होते त्यांत दिवसा शेळ्यांचा क्लब असे. रात्रीं मात्र तिथं लोक झोंपत. गांवांतील भजनी मंडळ या देवळांत दररोज एक तास म्हणजे बारा वाजेपर्यंत भजन करी. आणि दर एकादशीचे दिवशीं मात्र रात्रभर भजन असे. एरवीं भजनाला गर्दी मुळींच नसे. पण एकादशीचे दिवशीं मात्र देऊळ भरून जाई. आणि या गर्दीतील लोकांचं लक्ष बाहेरील सोप्यावरील नाना सनद्याच्या हालचालीकडे असे. 'रामकृष्ण हाऽऽरी' म्हणत भजनाचा ताफा उभा राहिला कीं इकडे नाना सनदी मोठा चुला पेटवून त्यावर एक भलं मोठं पातेलं आधण ठेवून देई. नवस भरपाई म्हणून कोणी दिलेल्या दुर्डीभर कपबशा तिथं आणून ठेवलेल्या असत. कुणाचा वशिला लावून कसा कपभर चहा ढोसावा हाच विचार बहुतेकांच्या मनांत चाललेला असायचा. पहांट होईपर्यंत नाना सनदी किती कप चहा भरील याचा हिशेबच नसायचा. आज एकादशी म्हणून भजनाला गर्दी होणारच होती; पण आज पालखीचा समारंभ असल्यानं सारं गांव देवळाकडे लोटलं होतं.

उघडींनागडीं पोरं, कांबळी पांघरलेले लोक, बायका यांनीं देऊळ व बाहेरील आवार गच्च भरून गेलं होतं. देऊळ उघड्या हवेवर होतं तरी इतक्या गर्दीनं सारं वातावरण कोंदट होऊन गेलं होतं. देवळांत देवीच्या पुढें दोन्हीं बाजूला भजनी लोक बसले होते. मधें ती जानबा पाटलाची नवी कोरी करकरीत पालखी ठेवली होती. तिच्या दांड्यावर तांबड्या पिवळ्या रंगाचे पट्टे होते. आंतील गाद्यांची तांबडी लाल साटीन ऑर्गनच्या प्रकाशांत चकचकत होती. आणि तिचे ते लोंबणारे लालभडक रेशमी गोंडे! 'काय झकास पालखी जानबा पाटलाची' प्रत्येकजण तोंडभर हंसून म्हणत होता. गाभाऱ्याची मर्यादा म्हणून घातलेल्या कठड्याच्या आंत गुरव देवीपुढें बसला होता. अजून देवीच्या पूजेला सुरवात केली नव्हती. कारण जिनं हा नवस केला होता, जिच्यासाठीं जानबा पाटलानं पाण्यासारखा पैसा खर्च करून इतकी सुंदर आणि भारी किंमतीची पालखी कोल्हापुराहून आणवली होती

ती जानबा पाटलाची बायको हिराबाई अजून आली नव्हती. तिच्या वाटेकडे सर्वांचे डोळे लागले होते.

जानबा पाटलाचं घराणं जसं खानदानीचं आणि संपन्न म्हणून गांवांत ओळखलं जात होतं, तसंच हिराबाईचं माहेरही मोठं खानदानीचं होतं. आणि त्यामुळें कोल्हापूर संस्थानांतील देसायांच्या घरचं खानदानीचं मराठ-मोळं वागणं हिराबाईच्या अंगांत भिनलं होतं. देसायांच्या घरांतून ती पाटलांच्या घरांत आली, पण तिनं आपला गोपा सोडला नव्हता. जानबा पाटलांचं घर खूप मोठं होतं. पण हिराबाई कधीं ओसरीवर दिसायची नाहीं. इनामदारांच्या घरचं हळदीकुंकू, सुगींतील शेतावरील धान्याची पूजा, किंवा माघांतल्या विशाळी आमावास्येची डोंगराखालच्या ब्रह्मदेवाची जत्रा अशा ठराविक प्रसंगींच ती घरांतून बाहेर पडायची. आणि ती देखील कातरवेळ झाल्यानंतर, दिवसा नाहीं. अशा उत्सवाच्या प्रसंगीं हिराबाईला पाहणं हा देखील एक उत्सवाचाच भाग वाटे लोकांना आणि ती होतीही पाहण्यासारखी. आजूबाजूच्या पांचपन्नास खेड्यांत तर हिराबाईसारखं रूप कुठं आढळलं नसतं.

पण या वेळीं तिनं देवळाच्या आंत पाऊल टाकलं मात्र, बायकांच्या जमावांतून 'अग बया! किती वाळली ग ही?' असे खेदजनक शब्द बाहेर पडले. हिराबाईनंच देवीपुढं बसून तिला हळदकुंकू वाहिलं, फुलं वाहिलीं; जरीच्या खणानं तिची ओटी भरली. तिच्यावरून निरांजन ओवाळलं आणि गुरवाच्या सांगण्यावरून तिनं आणि जानबा पाटलानं तिथं जवळच असलेली देवीची उत्सवमूर्ति हलकेच पालखींत ठेवली. पालखींतून देवीच्या तीन प्रदक्षिणा झाल्या अन् हिराबाईचा नवस पूर्ण झाला. जे जे कोणीं देवळांत आले होते त्या सर्वांना प्रसाद म्हणून पसा पसा चिरमुरे मिळाले.

झालेल्या श्रमानं श्रांत झालेली हिराबाई बायकांत तिच्यासाठीं मुद्दाम राखून ठेवलेल्या जागेवर जाऊन बसतांच कांहीं म्हाताऱ्या तिच्याभोंवतीं गोळा झाल्या.

'पाटलीणबाई, काय वळखवी लागना तुमची. किती वाळल्या

'अग बया—बाळराजांचं येणं काय सुखाचं हाय? असं रक्ताचं पाणी पाणी व्हावं तवा कुटं पोराचं सुख भोगायला मिळावं.'

'व्हन्जीचं काय डव्हाळ का काय ग—' हिराबाईची नणंद सांगू लागली, 'असं म्या कुटं कुटं बघायाला न्हाई बघ. आज चार म्हैनं झालं. पोटांत एक घास गेला असला तर शपथ. नुसती झुरणी लागलीया त्यासनी.' तिनं पदरानं डोळे पुसले.

'ये कमळा—हे काय ग हे? आज किती वर्सानं पाटलीणबाईची कूस उजवलीया, अन् तूं का डोळ्यानं पाणी काढतेस? जून झालीया कूस—तवा तरास होणारच—काय बी काळजी करूं नको. देवीच्या देवळांत बसून सांगतों पाटलीणबाईना मुलगा होणार. देवी नवसाला पावली तें का उगंच? त्याच गुरविणीच्या या बोलण्यानं हिराबाईच्या चेहऱ्यावर हसूं उमटलं? उमटल्याशिवाय कसं राहील.

आज किती वर्षं तिनं ज्या गोष्टीची खंत घेतली होती, ज्या गोष्टीच्या प्राप्तीसाठीं तिनं एकही प्रयत्न करून पहायचा सोडला नव्हता, ती गोष्ट आज तिला प्राप्त झाली होती.त्याचा तिला त्रास होत होता, पण तो त्रास सहन करण्यांत तिला आनंदच वाटणार नव्हता काय?

हिराबाईचं लग्न होऊन पंचवीस वर्षं होऊन गेलीं होतीं. तिच्या बरोबर ज्या नवऱ्या मुली गांवांत नांदायला आल्या होत्या त्यांच्या मुलांची लग्न थाटामाटानं साजरी होत होतीं. त्यांचे संसार गोकुळासारखे गजबजलेले होते आणि हिराबाई?

हिराबाईच्या घरांत अवांतर माणसं खूप होतीं. पण तिचं मन त्यांत रमत नव्हतं. तिच्या दूर गांवीं दिलेल्या नणंदा हक्कानं वर्षा दोन वर्षानं तिच्याकडे बाळंतपणासाठीं येऊन रहात. तिच्या जावाही येत. बाळबाळंतिणींची उस्तवार हिराबाई किती आस्थेनं करी, आणि जातेवेळीं बैलगाडींत बसतांना त्या म्हणत 'व्हंजी, आतां म्होरच्या खेपला आमास्नी भाचा दिसाया होवा बर का' आणि या त्यांच्या शब्दांनीं तिच्या काळजाचं पाणी पाणी होऊन जाई.

पोटीं मूल नव्हतं म्हणूनच कीं काय हिराबाईला मुलांची अतोनात

आवड. गांवांतल्या कोणाही बाईला शेतावर जायचं असलं आणि मूल संभाळणारं घरीं कोण नसलं कीं तिनं खुशाल आपलं मूल आणून हिराबाईच्या स्वाधीन करावं. केव्हांही तुम्ही हिराबाईच्या घरीं जा दहा पांच पोरं माजघरांत असायचींच. मुलांनाही तिथं मजा वाटे. शेंगा, गूळ, ओले वाटाणे, ओला हरभरा, हुरडा ज्या ज्या दिवसांत जो जो खाऊ मिळत असेल तो पोरांना तिथं भरपूर मिळायचा. हिराबाई मुलांचे असे लाड करायला लागली कीं वयस्क शेजारणी तिला म्हणत 'पाटलिणो' इतकी पोरांना जीव लावून करतीस खरं देव कसा तुझ्याकडं बघना? इतकीं पोरं घरांत खेळत्यात, खरं, कां शोभा दिसतीया? घराचा मालक होवा यांच्यांत खळाया–' मग हिराबाई तिथून निघून गोठ्यांत जाई, आणि कुठल्या तरी गाईच्या गळ्यांत मान टाकून पोटभर रडे.

या तीन चार महिन्यांत तिला शारीरिक त्रास होत होता. घेऱ्या येत होत्या उलटचा होत होत्या, अशक्तपणा आला होता. पण तिचं मन कधीं नाहीं इतकं प्रसन्न होत.

तिच्या आनंदाला पारावार नव्हता; पण दिवसेंदिवस तिची होत चाललेली दशा पाहून घरच्या मंडळींच्या मनानं मात्र ठाव सोडला होता. जानबा पाटील म्हणजे गांवांतील एक उत्साही व्यक्ति. पण या दोन महिन्यांत त्यांच्या चेहऱ्यावर कुणी मनमोकळं हसं पाहिलं नव्हतं. ज्या दिवशीं हिराबाईनं त्याला आपल्याला दिवस गेल्याचा संशय वाटतो म्हणून सांगितलं त्या दिवशीं त्याचं मन फुलून निघालं होतं. पण नंतर दिवसेंदिवस त्याचा उत्साह, त्याचा आनंद मावळत जात होता. आपल्या लाडक्या हिराची ती अवस्था पाहून त्याला वाटे. 'कशाला हे नवं लचांड उगावलं! नसतं तर लई व्येस झालं असतं.' हिराबाईनं जे जे नवस केले होते ते ते तो मोठ्या आस्थेनं पुरवीत होता; तरी त्यांत त्याचं मन लागत नव्हतं. म्हणून पालखीचा समारंभ आटपतांच हिराबाईसह तो तडक घरीं निघून गेला. आज भजनांत वीणा न धरतां जानबा पाटील घरीं कसे गेले याचं तिथल्या लोकांना मोठं आश्चर्य वाटून राहिलं.

पालखीचा समारंभ अजून लोकांच्या मनांत रेंगाळत होता तरी तो होऊन

गेल्यास दोन अडीच महिने लोटले असतील. गांवांतील लोक आतां पाटलाला मुलगा झाला कीं गांवजेवण होणार, घरपट्टी पेढे मिळणार असल्या गोष्टी करीत होते. पण अलीकडे पंधरा दिवस हिराबाई मात्र अतिशय अस्वस्थ होती आणि त्याला कारणही तसंच झालं होतं. पंधरा दिवसांपूर्वी एके रात्रीं जानबा बरीच रात्र करून घरीं आला. तो इनामदारांच्या घरीं बसायला म्हणून गेला कीं अशीच त्याला रात्र होई. गांवचे इनामदार आणि जानबा पाटील लहानपणापासून सवंगडी. येत्या साली शेतांत काय पेरावं, कोणतीं कुळं लावावीं याचा सल्ला देणारा जानबाच. गांवांतील तंट्याची मिटवामिटव जानबा पाटलाच्या मदतीनंच इनामदार करीत. अशा गप्पा मारून तो घरीं आला कीं मोठ्या आनंदांत असायचा. इनामदारांनीं आपल्याकडे अमूक एक कामगिरी सोपवली आहे हें घरच्या मंडळींना सांगण्यांत त्याला मोठी धन्यता वाटत असे.

पण त्या दिवशीं तो आला तो अगदीं कष्टी चेहऱ्यानं; आणि तडक हिराबाईच्या खोलीकडे गेला. हिराबाई डोळे मिटून अंथरुणावर पडली होती. जानबाची जाग लागतांच ती उठून बसली. 'कवा आल्यासा?'

'हा आत्ताच. पड तू. ताप निघाला तुझा!'

'न्हाई बा.'

त्यानं तिच्या कपाळावरून हात फिरवला. तिचं अंग त्याला रसरसलेलं लागलं.

'हा ताप कशापायीं येतोया' दोन्ही हातांनीं आपलं कपाळ गच्च दाबत तो म्हणाला.

'गुरविण अतीबाई काल आल्या व्हत्या. त्या म्हनत्यात–'

'चुलीत गेली तुझी गुरवीण–'

'त्या म्हनत्याता–'पोटशोबाईचं अंग तापनं कंदी कंदी.'–'

'आज आत्ता इनामदार म्हणाले–'जानबा' हिराबाईला तूं निपाणीच्या डागदाराला दावून आण. हयगय करूं नको!' मला बी वाटतया तसंच उद्यां निपाणीला जाऊन–'

'शी शी. डागदाराकडं जाया म्या काय दुखणंकरी हाय? आमच्या बाई

माणसांच्या भानगडींत आपून पडूं नगसा. म्या डागदाराकडं यायची न्हाई न् वखद बी घेणार न्हाई.'

'पण तुझा हा ताप कशानं हटायचा ?'

'गुरविण आतीबाई कसला की काढा देणार हाय.'

आणि त्या दिवसापासून हिराबाई काढा घेत होती, पण तिचा ताप हटला नव्हता. आणि जानबानं रोज भुणभूण लावली होती 'चल आपण निपाणीला जाऊ या. चांगला मुहूर्त पाहून येत्या रविवारीं निपाणीला जाण्यासाठीं त्यानं बैलगाडीही तयार करून ठेवली होती. हिराबाईला हें संकट प्राणापलीकडचं वाटलं. डॉक्टर कांहींतरी औषध देतील आणि कांहीं तरी भलतंच होऊन बसेल ही तिनें धास्ती घेतली होती.

त्या दिवशीं गुरुवार होता. जानबा निपाणीच्या बाजाराला गेला होता. त्याला परत यावयाला वरीच रात्र होणार होती. संध्याकाळीं अंधार पडतांच हिरावाई घरांत कोणाला न सांगतांच एकटी मागच्या दारानं घराबाहेर पडली. रस्त्यानं चालूं लागतांच आपण किती अशक्त झालों याची तिला कल्पना आली. तिचं पाऊल मोठं कष्ठानं पुढें पडत होतं. पाय थरथरत होते. अंगांत ताप असल्यानं बाहेरच्या गार वाऱ्यानं तिच्या अगांत थंडी भरून आली. तिनं पदर मस्तकावरून अंगाभोवतीं घट्ट लपेटून धरला. आणि कसंबसं गुरविणीचं घर गाठलं.

अशा वेळीं आणि अशा अवस्थेंत हिरावाईला दाराशीं पाहतांच गुरविण म्हातारी धावतच पुढं आली. ओटचावरच्या कांबळ्यानं तिनं पाटलिणीला लपेटलं. 'पोरी अदूगर चुली म्होरं चल' म्हणत तिचा हात धरून ती तिला घरांत घेऊन गेली. म्हशीपुढची धाटं आणून तिनं चुलींत घातलीं आणि जाळ केला.

'पाटील म्हनत्यात आइतवारी निपाणीला डागदाराकड जाऊ वा. इनामदार बी त्येच म्हनत्यात.' अंगांत थोडी ऊब येतांच हिराबाई म्हणाली.

'अरं देवा!' गुरविणीनं कपाळावर हात मारून घेतला. 'कुठल्या देवानं बुद्ध दिली ही तुमास्नी. पांचव्यांतच म्या तुझं पोट वघीतलया. चांगला चेंडू एवढा पिंड लागतोया हाताला. अन् डागदार ग कशाला त्यो?'

'पण अतिबाई आतां सात म्हैनं व्हतील, अन् पोटांत काय बी हालचाल न्हाई की जी–असं का–?'

'अग–पोरीचा पिंड तिनव्या म्हैन्यांत पटाटा उडया मारतोया, लई चपळ पण पोराचा पिंड तसा न्हाई. तो लई नाजूक. आठव्यांत आतां हालल बघ तुझ्या कुशींत.'

मुलाच्या कल्पनेनं हिराबाईच्या फिकट गालावर लाली चढली. थोडया वेळानं ती म्हणाली, 'पण हा ताप का हालना?'

'तुझं सगळ चांगलं व्हईल ग बाई. अशी भिऊ नगस.' तिच्या दोन्ही गालावरून हात फिरवून म्हातारी गहिवरून म्हणाली, 'हे बघ. आज फाटच म्या आमच्या भीम्याला बोळईला धाडतो! अन् यल्लमाची थाळी घेऊन काशीबाईला बोलावतो. तिला गाराणं घालुवा. ती जर म्हणाली 'जा निपाणीला तर जा.' कसं?'

'तसंच करा आतीबाई.' आणखी थोडा वेळ गप्पा गोष्टी करून हिराबाई घरीं परतली.

शुक्रवारीं हिराबाईच्या घरीं कोण गडबड. बोळाईहून काशीबाई यायची, घरांत यल्लमाची पूजा व्हायची, पुरणाचा नैवेद्य व्हायचा. आणि हें सगळं आटोपल्यावर यल्लम्माला गाऱ्हाणं घालायचं होतं. पहाटेचा कोंबडा आरवल्यापासून हिराबाईच्या घरचीं माणसं कामाला लागलीं होतीं.

काशीबाईला घेऊन गांवांत यायला भीम्याला बारा वाजून गेले. वेशीच्या दारांत काशीबाईच्या पायांतील घुंगूर छुम छुम वाजूं लागतांच काशीबाई आली ही बातमी गांवभर पसरली. गल्लींतल्या बायका पाण्याचा तांब्या आणि शिध्याचं सूप घेऊन दाराशीं येऊन उभ्या राहिल्या. काशीबाई दाराशीं आली कीं कांहीं बाया पुढं येत, तिच्या पायावर पाणी ओतून पदर हातांत धरून तिच्या पायावर डोकं ठेवीत. तिनं हळदीची चिमूट हातावर ठेवली कीं सुपांतील शिधा तिच्या थाळींत ओतीत आणि निघून जात. संध्याकाळीं तर जानबा पाटलाच्या सोप्यावर ही गर्दी जमली होती. यल्लमाच्या चकचकीत देवीसमोर उदबत्त्यांचा एक जुडगा धुमत होता. काशीबाई समोरच आसनमांडी घालून बसली होती. मधूनच जोरानं सुस्कारे सोडत होती.

मधून मोठ्यानं घुमत होती. आणि घुमतांना पिंगा घातल्याप्रमाणें अंगविक्षेप करीत होती. सर्व मंडळी अगदीं तटस्थपणें आतां काशीबाई काय सांगणार इकडे अवधान देऊन बसली होती.

कितीतरी वेळ घुमून झाल्यावर काशीबाई एकदम उसळून उठली.

'कोन म्हनतुया हिराबाईला निपाणीला न्या म्हून. सपै यायची न्हाई ती –माझा तिला हुकूम हाय. न्हाई–न्हाई –समजलो–कुणी वैऱ्यानं करणी केलीया –त्याला उतारा करायला होवा–न्हाई–पाटलीण सपै यायची न्हाई'

एवढे शब्द बोलतां बोलतांच काशीबाई घामाघूम झाली. आणि धाडकन खालीं पडली. कुणी वारा घातला, कुणी पाणी डोळ्याला लावलं. एकच गोंधळ उडून गेला. आणि शेवटीं ठरलं कीं करणीला उतारा करून पहायचा. डॉक्टरचं आणि दवाखान्याचं पुनः नांव काढायचं नाहीं.

रविवारींच शेजारच्या खेड्याहून मांत्रिक बोलावून आणून जानबा पाटलानं उतारा करून टाकला; आपल्यावरील एक महान संकट टळलं या समजुतीनं जानबा पाटलाच्या घरीं पुनः समाधान खेळूं लागलं. हिराबाई निजूनच होती. तिला ताप येतच होता. पण सर्वांना वाटत होतं, आतां काय दिवस भरत आले आहेत. यल्लम्माची कृपा आहे आपल्यावर. आणि दीड महिन्यांनीं घरांत आनंदी आनंद होऊन जाईल.

दिवसामागून दिवस जात होते. करणीचा उतारा करूनही हिराबाईच्या प्रकृतींत उताराचं चिन्ह दिसत नव्हतं. कधीं एकदां हे दिवस संपतात असं तिच्या घरच्या मंडळींना होऊन गेलं होतं. धुणी धुतांना विहिरीवरून पाणी आणतांना जेव्हां जेव्हां दोघी बायका एकत्र येत तेव्हां तेव्हां त्या म्हणत, 'काय ग बघा, पाटलिणीची काय खबर ? ती देवळांतली लक्ष्मी काय डोळे झाकून बसलीया काय ग? कधीं ती हातींपायीं सुटंल तवा खरं'

'तिच्या अंगाला सूज बी दिसतीया म्हणं ग–' एका बाईनं मधेंच बातमी पुरवली. आणि ही बातमी एकीकडून दुसरीला कळतां कळतां इनामदारांच्या वाड्यापर्यंत जाऊन पोचली. त्या दिवशीं जानबा घरीं येतांच इनामदार एकदम त्याच्यावर खवळून उठले.

'जानबा तुला बायको नको झालीय कीं काय? काय रे माणूस तूं! अंगाला सूज चढली तरी तूं स्वस्थ बसतोस'—

इनामदारांचं बोलणं ऐकतांच जानबाच्या डोळचांत पाणी उभं राहिलं.

'असं कसं बोलता सरकार; आज म्हैना झाला मी तिच्या मागं लागलोया. पण ती न्हायींच म्हणते. आतां मी तरी काय करूं? घरीं गेलों कीं डोळचा-वर ढांपणं ओढून बसतो. मला काय सुचत वी न्हाई. तुमी तरी सांगून बघा.'

'हिराबाईला दवाखान्यांत न्यायचं काम माझ्याकडे लागलं. पण मी सांगेन तसं तुम्ही सगळचांनीं ऐकलं पाहिजे. पुनः ती यल्लम्मा आणि जोतिबा मधें आणलींत तर मला चालणार नाहीं. हिरावाईला आतां मिरजेला न्यावी लागेल, समजलं?'

'काय? काय बोलत्यासा काय?'

'तुला माझं ऐकायचं आहे कीं सोन्यासारखी बायको हातानं घालवायची आहे?'

जानबा गप्प बसला.

नंतर दुसरेच दिवशीं इनामदार जानबाच्या घरीं स्वतः गेले. सोप्यावरील एका जाडयाजुडया खुर्चीत बसून त्यांनीं हिराबाईला हाक मारली.

थोडया वेळानं 'आईग' असा कण्हण्याचा आवाज आणि बांगडयांची खळखळ ऐकू आली. हिराबाई आंतल्या बाजूला येऊन बसली होती.

'हिराबाई' माझ्यावर तुझा विश्वास हाय नाहीं? मी तुझं कधीं वाईट बघणार नाहीं. जानबा माझ्या भावासारखा हाय हां, मी तुला काय सांगायला आलोय, लक्षांत घे. पुरुष माणसांनीं या गोष्टींत लक्ष घालूं नये. पण आतां पाळी आलीय ती. तुझे बाळंतपणाचे दिवस जवळ आले आहेत. तुझ्या प्रकृतीवरनं घरीं तुझं बाळंतपण नीट होईल असं मला वाटत नाहीं. तूंही इतकी अशक्त, कांहीं तरी होऊन त्या बाळजिवाला धक्का लागला म्हणजे? तेव्हां मी म्हणतो, मिरजेला चल तिथं छान व्यवस्था आहे बाळंतपणाची....'

आणि पुष्कळ वेळ त्यांनीं सांगितलं. तिची समजूत घातली. तिला खरं

वाढावं म्हणून वाटेल त्या आणाभाका केल्या. आणि शेवटीं सांगून उठले–
'आणि माझं जर ऐकलं नाहींस तर तुझ्या हातानं तूं तुझा अन् तुझ्या
मुलाचा घात करून घेशील. लक्षांत ठेव.'

मुलाचा घात होईल या कल्पनेनं हिराबाईच्या जीवाचं पाणीपाणी झालं
आणि तिनं इनामदारांच्या म्हणण्याला एकदम संमति दिली.

हिराबाईला हॉस्पिटलमधें पोचवून नर्सच्या ताब्यांत देऊन जानबा
बाहेर पडला. तो धावतच इनामदारांच्याकडे गेला. इनामदार बाहेर
उभे होते. त्यांच्या समोर उभं राहून त्यानं थाड थाड कपाळावर हात
मारून घेतला आणि मोठ्यानं हंबरडा फोडला. जानबासारख्या पुरुषाचं तें
हंबरणं ऐकायलाच किती भयंकर !

डॉक्टरनीं हिराबाईला तपासून मग जानबाला बोलावलं होतं. आणि
हिराबाईला नर्स आंत घेऊन जातांच त्यांनीं जानबाची खूप हजेरी घेतली
होती. त्याला जंगली म्हटलं होतं, माणसाचा प्राण जायची वेळ आली कीं
तुम्ही त्याला दवाखान्यांत घेऊन येता–– आतां ती बाई बरी होणं शक्य
नाहीं. असंही त्यांनीं त्याला समजावून दिलं होतं.

हिराबाई गरोदर नव्हती. एका भयंकर रोगानं तिच्या कुशींत ठाणं
दिलं होतं. योग्य वेळीं उपचार न झाल्यानं दुखणं विकोपास गेलं होतं. आतां
शस्त्रक्रिया हाच एक मार्ग होता. त्यांतही यशाची आशा नव्हती. पण
डॉक्टर तें धाडस करून पाहणार होते.

हॉस्पिटलमध्यें शस्त्रक्रियेची तयारी व्हायला कितीसा वेळ लागणार?
ऑपरेशनचं ऐकल्यापासून हिराबाईच्या डोळ्याचं पाणी खळत नव्हतं.
तिला बोलवतही नव्हतं. जानबा भेटायला येतांच तिनं लाज बाजूस ठेवून
जानबाच्या मांडीवर डोकं खुपसून ढसाढसा रडायला सुरुवात केली.

स्ट्रेचरवरून आणून तिला टेबलावर निजवलं होतं. क्लोरोफॉर्मची
तयारी करून एक नर्स तिच्या उशाशीं उभी होती. विवक्षित तऱ्हेचा
पोशाख केलेल्या दोन परिचारिका आणि एक उंचा पुरा गंभीर डॉक्टर
टेबलावरील हत्याराशीं कांहीं करत होते.

तिथली ती शांतता, तीं चकचकीत शस्त्रं, आणि ती अपरिचित मंडळी पाहून साध्याभोळ्या हिराबाईला थरकांप सुटला.

डॉक्टरनीं खूण करतांच क्लोरोफॉर्म देणारी नर्स टोपी घेऊन पुढें झाली.

हिराबाईनं आपलं सारं बळ एकवटलं, मान उंच केली आणि हात जोडून त्यांना म्हणाली–'डागदर साव, हे बघा, माजं काय बी हुद्या. खरं खरं बाळाच्या जिवाला धका लावूं नगसा---'

● ●

# विसावा

...१

केव्हांपासून आलेल्या ग्लानींतून माई नुकत्याच बाहेर पडूं लागल्या होत्या. आपण अजून जिवंत आहोंत तर, या कल्पनेच्या समाधानानं त्यांचं हलकं झालेलं शरीर त्यांना अधिकच हलकं वाटूं लागलं. आपण गादीवर पडलों आहोंत, ही जाणीव असूनहि आपल्या शरीराचा कण न कण सुटा सुटा झाला आहे आणि तो अतराळांत हलके हलके तरंगत आहे असं त्यांना वाटत होतं. या सुखाचा आस्वाद घेत घेत त्यांनीं हळूच डोळे उघडले. त्यांच्या अर्धवट सुप्त नजरेनं तें अपरिचित वातावरण टिपलं, तशीं त्यांना अधिकच जाग आली. आतां हलकं वाटणारं शरीर तासापूर्वी किती वेदना भोगत होतं याची त्यांना आठवण झाली. आपण प्रसूतिगृहांतून वॉर्डांतील आपल्या सात नंबरच्या कॉटवर कशा आलों याचं त्यांना आश्चर्य वाटत राहिलं. आपल्या बाळाला पहायला हवं ही इच्छाहि मनांत उसळून आली आणि त्यांनीं मान वळवून पूर्णपणें डोळे उघडले.

इतक्यांत त्यांच्याजवळ कुणी तरी आलं. 'कॉफी घ्या म्हणजे हुशारी वाटेल.' असं त्यांना म्हणत कॉफीचा भरलेला चमचा त्या व्यक्तीनं त्यांच्या ओठासमोर आणला. माईंनीं पुन्हा डोळे मिटले आणि ती कढत कढत कॉफी सावकाशपणें घेतली. कॉफी पोटांत जातांच त्यांच्या कपाळावर घामाचे थेंब उभे राहिले आणि त्यांचा फटफटीत चेहरा थोडासा उजळला.

'मुलगी झालीय तुम्हांला.' त्या व्यक्तीनं जरा मोठ्यानं सांगितलं.

माओींच्या चेहऱ्यावर एक क्षीण हास्याची लकेर उमटली. पण त्यांत उत्सुकतेची भावना नव्हती. या खेपेला मुलगी होणार हें त्यांना अगोदरपासून माहीत होतं. दोन मुली, दोन मुलगे अशी त्यांची ओळ होती. पांचवी शरू आतां सव्वा वर्षांची होती; नुकती चालू लागली होती. तेव्हां आतां तिच्या पाठीवर पुनः मुलगी होणार हें निश्चितच होतं.

पायगतीच्या पाळण्यांत कापडांत गुंडाळलेल्या त्या लालसर अर्भकाकडे त्यांनीं किंचित् मान उंचावून पाहिलं. शरूच्या आठवणीनं त्यांचं मन बेचैन झालं. ती किती रडली असेल, जेवली असेल कीं नाहीं, याची काळजी करत त्यांनीं पुनः डोळे मिटले; आणि कॉफीच्या सुस्तीनं पुनः त्यांना घेरलं.

दोन तीन तासांनीं त्यांना पुनः जाग आली, तेव्हां खूप हुशारी वाटली. उजव्या हातानं केस व्यवस्थित करीत त्या हळूच कुशीला वळल्या. दाईला क्षीण आवाजांत हांक मारून तिच्याकडून त्यांनीं बाळ आपल्या कुशींत घेतलं. निजल्या निजल्याच त्याच्या भोवतीचे कपडे काढले आणि त्याचीं लालचुटुक पावलं, पायाचीं बोटं तपासून पाहिलीं. सहावं बोट तर नसेल ही मनांत शंका. मुलाच्या मुठी त्यांनीं बोटानं हलकेच सोडवल्या. ती चिमुकलीं लालबुंद बोटं पसरून पाहिलीं. कानाच्या पाळ्या चाचपून पाहिल्या. कुठं कांहीं वेडवाकडं नाहीं अशी खात्री झाल्यावर त्यांनीं एक समाधानाचा सुस्कारा टाकला, आणि हळूच बाळाचा पापा घेतला.

त्या झोपल्या होत्या त्या अवधींत त्यांची मोठी मुलगी येऊन गेल्याचं त्यांना समजलं. क्षणभर सर्व घर डोळ्यासमोर उभं राहिलं; पण त्या बेचैन झाल्या नाहींत.

'काय करताहेत तें करूं द्यात घरीं. आतां दहा दिवस कांहीं मी त्यांची नाहीं.' असं स्वतःशीं पुटपुटत त्या बाळाकडे डोळे भरून पाहूं लागल्या. त्याच्या डोळ्याच्या चिरा किंचित् उघडल्या होत्या. ओठ वळवळत होते आणि हातपायांचा सारखा चाळा चालला होता. त्याच्या हाताची मूठ सारखी सारखी त्यांच्या कुशीला घासत होती, आणि त्या स्पर्शानं त्यांच्या शरीरांतून सुखाच्या लाटा उसळत होत्या. आतांपर्यंतचे मानसिक व शारीरिक

कष्ट, त्रास, साऱ्याचा कांहीं त्यांना विसर पडला होता. त्यांच्या उत्साहाला नव्या जोमाची पालवी फुटायला लागली होती.

त्या अशा रमल्या होत्या तों सकाळचीच नर्स पुन: एक कप भरून दूध त्यांच्यासाठीं घेऊन आली. त्यांनीं सहास्य मुद्रेनें तिचं स्वागत केलं. तिनं कप माईच्या शेजारीं ठेवला आणि बाळाला उचलून पाळण्यांत घातलं. निजल्या निजल्याच त्यांनीं दुधाचे घोट घेतले. असं निजून आरामांत दूध पिण्याच्या सुखानं त्यांचं शरीर सुस्त झालं. नर्सनं हलकेच रग त्यांच्या गळ्यापर्यंत लपेटला आणि दुधाचा रिकामा कप घेऊन ती निघून गेली.

'उठा, चहा घेतां ना ? उठा.' म्हणत नर्सनं त्यांना उठवलं, तेव्हां त्यांना अगदीं ओशाळल्यासारखं झालं.

'काय ग बाई तरी झोप !' म्हणत त्यांनीं रग कमरेपर्यंत बाजूला सारला आणि किंचित् उठण्याचा प्रयत्न केला. चहा फार चवदार होता. चहाबरोबर टोस्टहि होता. त्या हळुहळू फराळ करीत होत्या आणि नर्स त्यांच्या शेजारींच बसून होती. त्यांचीं गेलीं तीन बाळंतपणं याच नर्सनं केलीं होतीं. दोघींनाहि एकमेकींविषयीं स्नेहभाव वाटत होता.

'माई, हीं दोन बाळंतपणं तुम्हांला बरींच जड गेलीं हो. फार थकलां आहांत. असं बरं नाहीं. पहांटे तर शेवटीं शेवटीं मी घाबरलेंच. म्हटलं, धडपणीं बाई सुटते कीं नाहीं ! तुमच्या अंगांत ताकदच राहिलेली नाहीं.'

'गेल्या चार वर्षांत मला बरं नाहींच आहे. कधीं डॉक्टरकडे गेलं कीं म्हणतात, 'विश्रांति घ्या.' आपलं ऐकून घ्यायचं आणि सोडून द्यायचं.' माई क्षीणपणानं हसल्या.

'आपल्या शरीराची काळजी आपणच घ्यायला पाहिजे, बाई!'

माईनीं एक आंवढा गिळला; आणि त्या बराच वेळ स्तब्ध बसून राहिल्या.

दर महिना रुपये चाळीस अधिक म. भ. पंचवीस मिळवणाऱ्या एका प्राथमिक खाजगी शाळेंतील शिक्षकाचा संसार माईंना लाभला होता. प्रथम त्याहि नोकरी करीत होत्या. पण तीन मुलं होईपर्यंत त्यांची नोकरीची धडपड टिकून राहिली. चवथ्या खेपेला डोहाळे लागतांच त्यांनीं नोकरीचा

राजिनामा दिला होता. आणि मास्तरांनीं आणखी दोन शिकवण्या पत्क-रल्या होत्या. त्यांच्या संसाराचं स्वरूप हें असं ओढाताणीचं होतं.

या ओढाताणीच्या जाणिवेनं माईंची जीभ ओढल्यासारखी झाली. कष्ट तर होतेच, पण आणखीहि पुष्कळ होतं. कष्टापेक्षांहि तेंच त्यांना कांसावीस करून टाकत होतं. त्या हळुहळू बोलायला लागल्या. त्यांचा आवाज किंचित् तापला होता.

'ताई, कुणाचं शरीर अन् काय ? ज्या दिवशीं हें शरीर दुसऱ्याच्या स्वाधीन केलं त्याच दिवशीं शरीराचा दगड व्हायला सुरवात झाली. आतां त्याला स्वतःचं सुख–इच्छा–वासना–कांहींच नाहीं. शुद्ध दगड झालं आहे. त्याची काय काळजी घ्यायची—'

'असं कां म्हणतां ? मुलं लहान आहेत. एकच काळजी घ्या. आतां पुनः–'

'–बाळंतपण नको, असंच ना ?' माई रुक्षपणानं हंसल्या.

त्यांचं हें सहावं बाळंतपण. ज्याला हें कळे तो हेटाळणीनं किंचित हसे. किती किती मुलं –किती मुलं ? छे माईंना तें भारी बोचायचं. पण–पण तो 'पण' कसा सुटणार ?

मुलं फार नसावींत हें त्यांना कळत नव्हतं असं थोडंच होतं ? पण कळूनहि वळत नसणाऱ्या अशा गोष्टी असतातच कीं !

कालचींच सलणारीं शल्यं, आणि उद्यांचे रोखलेले भाले; शरीराचे कष्ट आणि मनाचे शीण; नोकरीच्या याचना आणि संसारांतल्या विवंचना;– या साऱ्या गोष्टी माणसाला विसरायला हव्या असतात. क्षणभर त्या साऱ्यांपासून दूर कुठं तरी विसावा हवा असतो. कुणी त्यासाठीं दारूकडे वळतो, तसच कुणी—व्यसनी माणसाला व्यसनाची वाईट बाजू माहीत नसते असं थोडंच असतं ? पण माहीत असूनहि त्याचा उपयोग काय होणार ? सारं कांहीं उगीचच. आणि म्हणूनच अगदीं कातर आवाजांत माई म्हणाल्या,

'ताई, कुणाला अन काय सांगायचं ? बाळंतपणाचा महिना जिथं अगदीं कसाबसा कोरा जातो–'

'बाई ग !' त्या नर्सच्या डोळ्यांत टचकन पाणी उभं राहिलं.

'पण मास्तर फार चांगले आहेत. त्यांची माझ्यावर माया नाहीं असं नाहीं. माझ्यासाठीं त्यांचा जीव सारखा तुटत असतो.'

'हें त्याचंच लक्षण वाटतं ?'

'असं नाहीं हो. तेहि माणूसच आहेत ना ? तुम्हाला सांगतें, जोंपर्यंत माझं मनहि दगड बनलं नव्हतं, तोंपर्यंत खूप प्रयत्न केले मी. पण व्हायचं काय ? सदा धुसफूस, चिडाचीड, अबोला, असाच सारा दिवस--कधीं त्यांनीं ताडकन् दार उघडून बाहेर निघून जावं, कधीं मी रागारागांत पोरांत येऊनझोपावं. काय फायदा त्याचा ? शेवटीं आतां मनाचाहि दगड झाला आहे बघा. दगड, नुसता दगड ! जीव आहे इतकंच काय तें–'

नर्सनं डोळ्याला पदर लावला.

माईना कसं तरीच वाटलं. त्या एकदम हसून म्हणाल्या,

'ताई, तुम्हांला एक गमंत सांगतें आतां. या खेपेला मला सातवा महिना होता, तेव्हां एक बाई आमच्या घरीं आल्या होत्या. प्राथमिक शिक्षकाच्या जीवनाची पाहाणी करणार होत्या म्हणे. बहुतेक तिचं लग्न झालेलं नसावं.

मला विचारलं 'बाई, तुम्हाला मुलं किती ?'

'मी म्हटलं, 'पांच.'

'आणि मग तिनं मला एक मोठं व्याख्यान सुनावलं. काय काय सांगितलन म्हणतां–मी तिचं सगळं ऐकून घेतलं. आणि म्हटलं,

'बाई, तुम्हीं सांगतां तें खरं आहे. पण मोठी अडचण आहे.'

'कसली अडचण ?' म्हणून ती लगेच पुढं झाली. जशी तिला सोडवतांच आली असती !

'तशी मी सांगितलं,

'महिना पंधरा दिवसांनीं रंगांत, मजेंत जिथं गांठीभेटी होतात–तिथं त्या तुमच्या साधनांचा न् बादनांचा उपयोग. इथं हो काय? रोज मरे त्याला कोण रडे? समजलांत? आमच्या मागची कटकट देवानंच सोडवावी !'

'तशी ती बाई अशी फणकाऱ्यानं निघून गेली—'

त्या गोष्टीची आठवण होऊन माईंना हसूं आलं. आणि 'आई ग' असं विव्हळत त्या आडव्या झाल्या. बोलण्याच्या भरांत आपण कधीं उठून बसलों, हेंहि त्यांना समजलं नव्हतं. त्यांचं पोट दुखूं लागलं होतं.

'अगबाई! तुम्ही बसलां होतांत—माझं मेलीचं लक्षच नाहीं. थांबा हं. शेकायला पिशवी आणून देतें.' असं म्हणत माईंच्या विचित्र कहाणीचा विचार करीत नर्स कपबशा उचलून निघून गेली.

माई कपाळावर हात दाबून वेदना सहन करीत होत्या. तितक्यांत एका दाईनं निरोप आणला,

'तुमचे मास्तर आलेत—'

आतां या क्षणाला तरी माईंना मास्तरांचं दर्शन नको होतं. त्या विव्हळत म्हणाल्या, 'त्यांना सांग, जरा पोट शेकणं चाललं आहे.'

या निरोपानं मास्तर आंत येणार नाहींत, अशी माईंची कल्पना असावी. पण निरोप समजल्यावर मास्तर तसेच आंत आले. इतर बाळंतिणींच्या खाटा ओलांडून पार्टिशनच्या आंत आले. माईंना त्यांची चाहूल लागतांच त्या हलकेच कोपराचा आधार घेऊन अर्धवट उठल्या. डाव्या हातानं उटीपोट दाबून धरत त्यांनीं डोक्यावरून पदर घेतला, आणि मास्तरांच्याकडे पाहून क्षीण हास्य केलं.

'कां, ठीक ना? मुलगीच?'

'हो.'

मग मास्तरांनीं पाळण्यांतून मूल काढून मांडीवर घेतलं. त्याच्याकडे पहात मास्तर म्हणाले,

'जरा अशक्त वाटते नाहीं? सहा पौंड वजन असेल.'

माई स्वस्थ राहिल्या.

'घरांत पोराटकी झालीय नुसती. आज कमीनं शेर दूध उपडं केलं—घाईच फार!'

'कांहीं सांगूं नका मला.'

'आतां शिकवणीला येणार नाहीं म्हणून सांगून आलों. आतां दहा दिवस सकाळच्या शिकवण्या बंदच.'

'हं.'

'मुद्दाम आतां चौकशीला आलों. सकाळीं फुरसतच नाहीं–'

'हो ना.'

मग बराच वेळ मास्तर स्तब्ध बसून राहिले.

'तुम्ही जा आतां. दिवे लावायची वेळ झाली. पोरं दिव्यापाशीं मस्ती करतील.'

'निघालोंच.' म्हणत मास्तर उठले. मूल त्यांनीं पाळण्यांत ठेवलं दाईनं आणलेली पाण्याची पिशवी बायकोकडे देत ते काळजीच्या सुरांत म्हणाले,

'पोट दुखतं तें एरवींच ना? शेकून घे. शेकून घे.

मास्तर निघून गेले तसं माईंना बरं वाटलं. पिशवी पांघरुणांतून आंत घेऊन त्या निपचीत पडून राहिल्या. पाळण्यांत मूल जागं होतं. हातपाय हलवत होतं. तें पहात पहात त्या पुनः सर्व कांहीं विसरून जाण्याचा यत्न करूं लागल्या. मघाशीं जें नर्सपाशीं बोलत होतं तें जागं झालेलं स्त्रीचं अंतःकरण बोलत होतं. आणि म्हणून श्लील-अश्लील, नीति-अनीति, सत्य-असत्य, या पलीकडचं तें बोलणं होतं. त्याची आठवण होतांच त्यांना आतां मात्र चमत्कारिक वाटलं. आणि नको असलेली वस्तु बाजूला फेकावी तसा तो विचार त्यांनीं दूर सारला आणि आपल्या तान्ह्या बाळांत त्या रमल्या.

त्यांचे ते दहा दिवस किती सुखाचे गेले. घराविषयीं एक प्रकारची बेफिकिरी त्यांच्या मनांत बाणली होती. त्या दिवसानंतर पुनः मास्तर त्यांना भेटायला आले नव्हते. रोज दुपारीं बाराच्या सुमाराला त्यांची थोरली मुलगी कमी शरूला कडेवर घेऊन येई. थोडा वेळ त्या शरूचं कौतुक करीत. तिला बाळ दाखवीत. आणि मग कमीला म्हणत,

'जा बाळा घरीं–पोरं घरांत आहेत.'

तिनं सांगितलेल्या तक्रारी मुकाट्यानं ऐकून घेत. कांहीं फोडल्या लवंडलेल्याच्या बातमीनंहि त्यांना राग येत नव्हता.

'करा. दहा दिवस काय करतां तें करून घ्या.' असं म्हणत त्या हंसत.

कमी निघून गेली कीं, त्यांना अगदीं हलकं वाटे.

असंच आपलं बाळ सदोदित लहान असावं आणि आपणहि असंच सारखं सारखं पडून रहावं. कुणी यावं, चहा द्यावा, कुणी ताट वाढून आणावं. जेवण तरी किती सुग्रास. लिंबाचं लोणचं, लसणाची चटणी, भरपूर तूप, आणि वाफा येत असलेलं गरम गरम अन्न–घरीं असं कुठं असणार? नेहमींच अपुरं जेवण. भाजी असेल तर आमटी नाहीं. तूप तर पहायलाहि मिळत नाहीं. आणि कढत अन्न जेवण्याचं सुख– तें तरी कुठं मिळतं? रोज मास्तरनां शाळेंत पाठवायचं, मुलांचं आवरायचं, आणि मग पितळींत वाढून घ्यायचं. तोंवर भाताचे डिखळे आणि आमटीचं कोमट पाणी झालेलं असायचं. उजव्या डाव्या बाजूचं कालवण मुलांच्या तडाख्यांतून उरलं तर भाग्य! पण इथं या जेवणांत त्यांना एक प्रकारची चैन वाटायची. चाखत माखत त्या जेवायच्या. चार घास अधिकहि जायचे.

बाळ झोपलं कीं इतर खाटांकडून फेरी काढायची.

साऱ्याच बाळंतिणी वॉर्डांतल्या. आणि म्हणूनच समदुःखी. कुणाचं चवथं, कुणाचं सातवं अशीं बाळंतपणं. त्यामुळं भेटीलाहि सहसा कुणी यायचं नाहीं. कोपऱ्यांतील खाटेवर एक पहिलटकरीण होती. तिचा नवरा रोज तीनदां यायचा. साऱ्या बाळंतिणी त्याच्याकडे पाहून कुत्सित-पणानं हसायच्या. माईहि आंवढा घोटून त्या चेष्टेंत सामील व्हायच्या. प्रत्येकीच्या घरचे अनुभव, बाळंतपणांतील खोडी, नवऱ्याचे स्वभाव चर्चेला निघायचे आणि या रसाळ गप्पांत वेळ कसा जायचा तें समजायचंहि नाहीं.

रात्रीं अगदीं गाढ झोपावं. मूल दाईच्या स्वाधीन असायचं. रडेल बिडेल कांहीं काळजी नको.

खरंच. किती सुखाचे दिवस! आणि त्यामुळं दहाव्या दिवशीं रात्रीं माईंना उगीचच अस्वस्थ वाटायला लागलं. स्वतःच्या घरीं जायला मन

घेईना. तें सारं घर–ती चूल–तें रेशन–तें धुणं–तीं भांडीं–मुलं–आजारपण –नवऱ्याचा राग––सारं सारं भुतासारखं त्यांना भेडसावायला लागलं. मुलाला छातीशीं घेऊन त्या स्वतःला विसरू पहायला लागल्या.

या रात्रीच्या शिणानं सकाळीं त्यांना जाग आली, त्या वेळीं कमी येऊन तयार होती. आज अकरावा दिवस. आज त्यांना तिथं चहा मिळणार नव्हता. त्या मुकाट्यानं उठल्या.

'तूं आलीस ?' आपले कपडे आवरत त्यांनीं कमीला विचारलं.

'बाबा म्हणाले, मी घरांतलं करतों, तूं आईला आणायला जा, म्हणून आलें मी.'

तिच्या कडेवरील शरू हात पुढं करीत म्हणाली,

'आई, बाबा शिला कलतायत.'

माई उगीचच हसल्या. आणि त्यांनीं मुलाला कपडे चढवायला सुरवात केली. तें दहा दिवसांचं सुख अजून त्यांच्या डोळ्यासमोरून हलत नव्हतं. मुलाला टोपरं घालतां घालतां त्यांच्या मनांत विचार आला,

'आतां आजपासून पुनः कष्ट–पुनः कामं–शरीरांत प्राण असेपर्यंत उभं रहायचं आणि––आणि––कसली तरी किळस त्यांच्या शरीरांत थरकांप उडवून गेली, पण लगेच खुदकन् त्या हसल्या. पुनः वर्षा सव्वा वर्षांनीं असा परत विसावा––तें हसूं त्यांना कोयनेलसारखं लागलं. त्यांनीं मुलाला बाळंत्यांत नीट गुंडाळलं, छातीशीं धरलं, माथ्यावरून नीट पदर घेतला. सामानाचं गाठोडं कमीच्या हातांत दिलं. आणि समोर असलेल्या दाईच्या, नर्सच्या हातावर चार आणे, आठ आणे ठेवीत त्या हळूहळू जिना उतरल्या. दाराशीं धमणी उभी होती. गाडीवानानं दार उघडतांच, मुलाला सावरत त्या हलकेच धमणींत चढल्या. पुनः घरीं निघाल्या.

● ●

# शाप ... १०

दिनकरनं स्वयंपाकघरांत डोकावून पाहिलं तो त्याला मालन कुठं दिसलीच नाहीं. शेगडींतील निखारे फुलून लाल होऊन त्यांतून ज्वाळा निघत होत्या. ट्रेमधें कपबशा मांडल्या होत्या; आणि त्यांची गुबगुबीत पांढरी शुभ्र मांजरी दुधाच्या आशेनं जवळच डोळे किलकिले करून स्वस्थ बसून राहिली होती.

'अजून चहा व्हायचा आहे तर,' च्या, नाराजीनं त्यानं केसांवरून एकदां हात फिरवला आणि तो आंत आला. तो आल्याचं मालनला समजलं नसावं. कपाटाच्या दारा आड ती उभी होती. साखरेचा डबा उघडला होता, आणि चमच्यानं साखर वर खालीं करण्याचा तिचा चाळा सुरू होता. त्यानं तें पाहिलं आणि मागून हळूच तिच्या खांद्यावर हात ठेवून तो म्हणाला---

'कां–साखर खायचा बेत आहे वाटतं?'

'चला'–ती ओशाळल्यासारखी झाली.

'चला काय म्हणून! खा ना. साखरेच्या डब्यांतील साखर, गुळाचा डबा उघडला कीं गुळाचा खडा, खोबऱ्याचा डबा काढला कीं थोडं खोबरं. खावंसं वाटतं ना?'

'कां असे माझ्या मागं लागलां आहात'– त्रासिकपणानं ती शेगडीजवळ

बसून चहाचें आधण मापूं लागली. भिंतीकडेचा पाट ओढून त्यानंही तिथंच बैठक मारली.

शेगडींतील निखाऱ्यावर नजर स्थिर करीत ती म्हणाली,

'हें वर्ष तरी मोकळेपणानं जायला हवं आहे मला.'

'म्हणजे !' मांजरीला कुरवाळत तो म्हणाला.

'तुम्हांला नाहीं समजायचं–कधींच नाहीं समजायचं.'

'अग–पण–'

त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ती म्हणाली,

'मला यंदा बी. टी. व्हायचं आहे. मी नांव घालण्याचा फॉर्म देखील आणून ठेवला आहे.'

'पुन: तुझा बी. टी. चा नाद सुरू झाला तर.'

'कां ?'

'दोन वर्षांपूर्वीं असाच बी. टी. चा नाद घेतलास आणि बेटा पदरांत पडला ! आतां पुन: बी. टी. बी. टी. चालवलं आहेस तेव्हां बेटी–'

'मारू कां आतां–'

'तिच्या अभिनयावर तो खूष झालासं दिसलं. पण ती एकदम गंभीर झाली.

'मला ज्या गोष्टी नकोत, त्याच तुम्हाला आवडूं लागल्या आहेत. दु:खावर डागण्या देतां–जरा तरी कांहीं वाटतं का तुम्हांला–'

'पण तुला तरी इतकं चिडायला आणि वैतागायला काय झालं ? निसर्ग म्हणजे कांहीं यंत्र नव्हे. एकादा दिवस आगेंमागें झाला कीं इतकं घाबरायला कशाला हवं ?'

'तें मला समजतं, पण पंधरा दिवस–'

'होतं तसं कधीं कधीं–शिवाय आपण काळजी घेतच असतो. तूं विनाकारण मनस्ताप करून घेते आहेस–'

तो किती वेळ तरी तिची समजूत घालत होता, पण मग ती फारशी बोलली नाहीं. चहाचं सामान त्यानंच आवरलं. बाहेर खेळत असलेल्या श्रीकांताला घरांत बोलवून दूध पाजण्याचं काम त्यानंच केलं. त्यानं घातलेल्या समजुतीनं तिच्या मनावरील काळजीचा भार कमी झाला नव्हता हें तिच्या डोळ्यांवरून स्पष्ट दिसत होतं. श्रीकांतला कपडे घालून फिरायला जाण्याच्या तयारीनं तो आला तेव्हां मोठ्या कष्टानं ती त्याच्या-बरोबर बाहेर पडली. श्रीकांताच्या गतीनं पावलं टाकत दोघही निघालीं होतीं. बोलण्याचा सारा मक्ता श्रीकांतनं घेतला होता. आणि उत्तर देण्याचं काम दिनकर करत होता. दिनकरनं कांहीं विचारलं तरच हिनं बोलावं. रात्रीं जेवणाकडेही तिचं फारस लक्ष नव्हतं.

आज आठदहा दिवस, मालनचं हें असं वागणं चाललं होतं. दिनकरला आतां तें माहित होऊन गेलं होतं. दरमहिन्याला हें ठरलेलंच होतं. एक तारीख उलटून गेली कीं मालनचा जीव अगदीं टांगल्यासारखा होई तिला. खाणं पिणं कांहीं सुचायचें नाहीं. काळजीच्या भारानें तिला अगदीं पिचल्यासारखें होऊन जाई. पण आतांपर्यंत तिच्या मनोवृत्तीला असा ताण कधीं पडला नव्हता. कॅलेंडरवर वीस तारीख दिसूं लागली तरी मालनची काळजी दूर झाली नव्हती.

आणि तिनं अितका कां घोर लावून घ्यावा हें दिनकरला कळत नव्हतं. श्रीकांतला आतां तीन वर्षं होऊन गेलीं होतीं. त्याला एक छोटीशी बहीण नको होती काय ? त्याला बहीण हवी असण्यापेक्षां दिनकरला मनापासून आपल्याला छोकरी हवी असं वाटे. पण हें मालनकडे बोलून दाखविण्याची सोय नव्हती. मालनला श्रीकांताच्या खेपेला अितका त्रास झाला होता—जवळ जवळ मरणाच्या दारांतून ती परतली होती. तिला पुनः त्या संकटांत पडायचं नव्हतं. मुळींच पडायचं नव्हतं. मालनच्या सुखासाठीं दिनकरला आपल्या मनाच्या हौशीकडे दुर्लक्ष करणं जरूर होतं. तरी पण मालन जो विनाकारण त्रास करून घेत होती तें त्याला पसंत नव्हतं.

त्या दिवशीं तो तिला म्हणाला होता—

'मालन, असा आतां किती त्रास करून घेणार आहेस तूं ? त्याचा कांहीं उपयोग आहे का ? कां उगीच आपलं–'

'तुम्हांला तें कधींच कळायचं नाहीं–'

'असं कां समजतेस–'

'खरंच, तसं जर कांहीं असेल तर तें मला नको आहे. खरंच नको आहे.'

'तस कांहीं नाहीं हें मी तुला कितीदां सांगू–आणि समज असलें तर–तर आपण डॉक्टरकडे जाऊन बंदोबस्त करून टाकू. पण हे तुझे हाल मला पाहवत नाहींत.'

'खरंच डॉक्टरकडे जाऊ या'

'हो' त्यानं कुठंतरी पहात उत्तर दिलं.

'खरंच?'

'अशी कशी ग अगदीं ही तूं!'

डॉक्टरकडे जायचें ठरवलं आणि तिनें सुटकेचा श्वास टाकला. पण तें तरी एवढं सोपं होतं काय? डॉक्टर–दवाखाना–म्हटलं कीं तिच्या अंगावर शहारे येत. आणि शिवाय पूर्वींच्याच डॉक्टरकडे जायचं–छे प्राण गेला तरी नाहीं.

श्रीकांताच्या खेपेची तिला आठवण झाली– त्या प्राणांतिक वेदना. ती–ऑपरेशनरूम–ती शेल्फवरील आणि पसरट भांड्यांतील चकचकीत शस्त्रं–ते पांढरी ॲप्रन घातलेले डॉक्टर–तो क्लोरोफॉर्म–छे–छे त्या डॉक्टरकडे ती जाणं मुळींच शक्य नव्हतं. पण याहीपेक्षां आणखी एक जबरदस्त कारण होतं–

मोठ्या शिकस्तीनं मालनची सुटका केल्यानंतर थोड्या वेळानं तिच्या समाचारासाठीं म्हणून डॉक्टर तिच्या खोलींत आल्या होत्या, तिच्या उशागती खुर्चीवर बसून तिच्या कपाळावरून हात फिरवत त्या म्हणाल्या होत्या––

'आतां बरं वाटतं ना– गुलामानं फ़ार त्रास दिला तुम्हांला–आई होणं सोपं नाहीं बरं मालतीबाई!'

पाळण्यांत ते दीड तासांचें अर्भक डोळे मिटून पडलें होतें, त्याच्या

कानशिलावर फॉरसेपस्च्या खुणा स्पष्ट दिसत होत्या. त्या लाल भडक खुणाकडे पहात मालती तळमळून म्हणाली—

•'पुरे झालं हें आईपण–आतां पुनः नाहीं–कध्धीं कध्धीं या भानगडींत पडणार नाहीं. प्राण गेला तरी नाहीं' इतकें बोलण्याच्या आवेशानें तिला धाप लागल्यासारखी झाली.

तिचं तें बोलणं ऐकून डॉक्टर हसल्या.

'मालतीबाई, असें म्हणता पण—खरें नव्हे हें. अहो, आमच्या इथून जाणारी प्रत्येक स्त्री–त्यांतल्या त्यांत पहिलटकरी नेहमीं असंच म्हणते–'कीं आतां पुनः नाहीं.' आपल्या लेकराचीच काय पण माझी देखील शपथ घेऊन सांगतात– कीं 'पुनः नाहीं' पण दीड दोन वर्षांत पुनः हजर!'

'त्यांचे नवरे राक्षस असतील! पण मी तरी पुनः नाहीं.'

जातांना दाराचा पडदा नीट करत डॉक्टरनीं तिच्याकडे वळून पाहिलं आणि त्या पुनः हसल्या. जणू ती बोलली तें अगदीं बालिश होतं. तिला राग आला. पण डॉक्टरवर रागावणं तिला कसं शक्य होतं.

मग आतां पुनः त्याच डॉक्टरकड जायचं! तिनं खूप हट्ट धरला कीं आपण दुसऱ्या डॉक्टरचा सल्ला घेऊं. पण दिनकर तिचं ऐकण्यास तयार नव्हता.

ती डॉक्टरकडे दिनकरबरोबर गेली ती अगदीं शरमिंदी होऊनच. डॉक्टरनीं अगदीं प्रसन्नपणानं स्वागत केलं; जणूं त्या तीन वर्षांपूर्वींच तिचं बोलणं विसरूनच गेल्या होत्या. तपासून झाल्यावर इंग्रजींतच त्या तिला म्हणाल्या,

'आतां आपल्याला बेबी होणार आहे हें कळलं तर तुम्हांला मोठा आनंद होईल नाहीं ?' मालनचा चेहरा एकदम काळवंडून गेला. आवंढा गिळून ती एकदम म्हणाली–

'नाहीं नाहीं तुमचा तर्क चुकीचा आहे डॉक्टर.'

डॉक्टरनीं विस्मित होऊन भुवया उंचावल्या.

बाळंतपणाची तिनं दहशत घेतली होती, आणि पुनः त्या अनुभवांतून तिला जायला नको होतं. एकटा श्रीकांतच तिला पुरे होता. तिची प्रकृति

चांगली होती तरी तिच्या नर्व्हस टेंपरला मुलाची दगदग सोसली नसती तिला मुलांचीं बंधनें नको होतीं. त्यांत तिला सुख वाटणें शक्यच नव्हतं. रुक्ष नजरेनें कुठं तरी पहात तिनें या साऱ्या गोष्टी डॉक्टरना सांगितल्या.

'अस्स!' असें आपल्याशींच म्हणत डॉक्टर उठल्या अणि प्रिस्क्रिप्शन लिहिण्याच्या टेबलाशीं गेल्या.

पुढच्या सोमवारीं सकाळीं म्हणजे आणि आठ दिवसांनीं तिला दवाखान्यांत येण्याविषयीं डॉक्टरनीं सांगितलें होतें. दवाखान्याच्या पायऱ्या उतरतांना तिला हलकं वाटलं. आज पंधरावीस दिवस मनावर वाहिलेलं ओझं जणू आपण फेकून दिलं असं तिला वाटलं. आतां काळजीचं काय कारण होतं! पण तसं झालं नाहीं. दिनकरबरोबर बोलत बोलत रस्त्यांतून चालत असतांनाच तिला जाणीव झाली कीं, नाहीं, आपल्या मानेवरलं ओझं कमी झालं नाहीं, उलट शतपटीनं वाढलं आहे. वर वर ती बोलत होती, हंसत होती आंत आंत तिच्या मनांत वादळ उठलं होतं. तिच्या मनांत किती तरी मालन निर्माण झाल्या होत्या, आणि पदर खोचून एकमेकीशीं भांडायला उठल्या होत्या.

'चांडाळणी, कसला अघोरी निर्णय घेतला आहेस!' एक मालन केव्हढ्यांदा किंचाळली.

'मला या वर्षी बी. टी. झालंच पहिजे. त्यांत हा अडथळा नको आहे.' दुसरी मालन तावातावांनं म्हणाली.

'दिनकर तुझा आहे, त्याच्यावर तुझं प्रेम आहे ना? मग त्याच्या मनाकडं बघ' 'आतां आपल्याला एक छोकरी हवी बुवा!' असं तो म्हणाला होता तें विसरलीस काय? तिसऱ्या मालननं कळवळून प्रश्न विचारला.

'तुझ्या साऱ्या सबबी खोट्या आहेत. तुला जबाबदारी नको; बंधनं नकोत; फक्त चैन हवी आहे. चैन हवी आहे.' चवथी मालन ओरडली.

आणि हें त्यांचं भांडण कोणाशीं चाललं आहे हेंच तिला कळेनासं झालं. तिला रस्त्यावरील सारे लोकं आपल्याकडेच पहात आहेत असं वाटूं लागलं. आणि झपझप पावलं टाकीत तिनं घर गाठलं. दाराशीं श्रीकांत खेळत होता. त्याच्याकडे ती एकदम धावली. त्याला तिनं वर उचलून घेतलं आणि

त्याचे मुके घेऊन घेऊन त्याला नकोसं केलं. विस्मित होऊन दिनकर तिच्याकडे पहातच राहिला.

त्या दिवशीं तिला रात्रभर झोप आली नाहीं. दिनकरनं तिची समजूत घालावी आणि त्याचं सगळं ऐकून घेऊन शेवटीं तिनं म्हणावं 'मला कांहींच कळत नाहींसं झालं आहे.'

दिनकरला वाटून गेलं किती विचित्र आहे स्त्रीचं मन! तें दुसऱ्याला कळत नाहीं तें नाहींच, पण तिचं तिला स्वतःलाही कळत नाहीं. आणि अशा या नाजूक मनाला मनस्ताप तरी कोण! आधुनिक स्त्रीला हा शाप तर नाहीं!

कांहीं झालं तरी डॉक्टरच्या मदतीशिवाय प्रश्नाचा निकाल लागला तर त्याला हवा होता. तीही तेंच इच्छीत होती. रोज संध्याकाळीं कामावरून येतांच डोळ्यांतूनच त्यानं तिला प्रश्न विचारावा आणि तिनंही डोळ्यांतूनच नकाराचं उत्तर द्यावं– ते आठ दिवस त्याचे असे चमत्कारिक जाणार होते!

त्या दिवशीं रात्रीं झोपेंतच ती इतक्या जोरानं ओरडली–जणूं सापच अंगावर आला! दिनकर ताडकन उठून बसला. त्यानं तिला जवळ घेतलं तिच्या सर्वांगाला घाम सुटला होता; आणि भीतीनं धड बोलतांही येत नव्हतं. श्री–श्री–असं कांहीं बोलण्याचा ती प्रयत्न करीत होती. दिनकरनं तिला शांत केलं. दिव्याचं बटण ओढून खोलींत प्रकाश केला आणि म्हणाला–

'काय झालं काय तुला'..,

'काय भयंकर स्वप्न पडलं हो.!'

श्रीकांताला हाताशीं धरून ती रस्त्यानं चालली होती. तोच मागून एक मालवाहू मोटार आली. तिचं चाक श्रीकांतच्या अंगावरून गेलं आणि रक्ताची जी चिळकांडी उडाली–सांगतां सांगतां घाबरून तिनं दिनकरला घट्ट धरलं

'मन अस्वस्थ असलं कीं असं कांहीं दिसतं स्वप्नांत; झोप पाहूं आतां' तिच्या अंगावरून हात फिरवत दिनकर म्हणाला. पण मग तिला झोप आलीच नाहीं. दिनकरनं उठून खिडकी उघडली आणि चांदण्याचा पट्टा

आंत घेतला. बोलतां बोलतां पहांट केव्हां झाली हें त्यांना समजलेंच नाहीं. उजाडतां वार सोमवार होता.

श्रीकांताचें जेवण खाण आटपून त्याला गांवांतील आपल्या बहिणीकडे पोचवून दिनकर घरीं आला तो मालन स्वयंपाकघरांतच कांहीं करत होती. त्याची चाहूल लागतांच आंतूनच ती मोठ्यानं म्हणाली.

'जरा, याना आंत'--

'कां ?'

' हें पहा–हें तुमचं दुपारचं जेवण, हें या डब्यांत रात्रीचं जेवण हीं शंकर पाळीं न् यांत हा चिवडा'–

'माझी बहीण आहे गांवांत–'

'तिच्याकडे उद्यां जेवायला जाल–पण चहाच्या वेळीं चुकल्यासारखं होईलना, म्हणून–'

'माझी काळजी करत बसलीस–आणि तुला आतां डॉक्टरकडे जायचं आहेना ? अजून स्नानही नाहीं.–' तिच्या गालाला लागलेलं काळं पदरानं पुसत तो म्हणाला–

'ही निघालेच' म्हणत तिनं कपडे नि टॉवेल खांद्यावर टाकला आणि ती न्हाणीघराकडे वळली. तिनं दार बंद करून घेतलं तरी तो तिकडेच पहात राहिला. वादली बंबाच्या तोटी खालीं ओढल्याचा खरं आवाज त्याला ऐकूं आला. मग किती वेळ बंबांतील पाणी वादलींत पडत होतं. मग तांब्याचा खणखणाट–आणि एकदम

'चांद के तारे शरमाये जा–घुंगट खोलो ऽऽ! ' कुठं तरी ऐकलेल्या कवालींतील चरण !

'आपण स्वप्नांत तर नाहीं ! ' किती दिवसांनीं मालनचं गाणं त्याला ऐकूं येत होतं. त्याच स्वरांची शीळ घेत तो बाहेर आरामखुर्चीवर येऊन पडला. साडे दहाचा ठोका भिंतीवरील घड्याळांत पडला तसा तो भानावर आला. तिला डॉक्टरकडे पोचवून मग त्याला कामावर जायचं होतं.

' मालन–ए–मालन '––तेथूनच तो मोठ्यानं ओरडला.

'आले'—म्हणत तिनं दार उघडलं. ब्लाऊजची वटणं घालीतच ती खोलीच्या दाराशीं आली; आणि मग आंत धावलीच. आरामखुर्चीशेजारीं एकदम बसकण मारून तिनं त्याच्या अंगावर रेलून दिलं आणि म्हणाली—

'तुमचाच तर्क खरा ठरला अखेर'—

'सुटले एकदाची—'असं म्हणतच ती अितकी लाजली.

तिचा खांदा घट्ट दाबून ठेवून तो स्वस्थ राहिला. त्याचं प्रसन्न मन साबणाच्या शीतल सुगंधानं अधिकच प्रसन्न झालं होतं.

आवेगाचा क्षण ओसरल्यावर तिनं हळू हळू आपला चेहरा वर केला आणि गंभीरपणें म्हटलं,

'काय मनस्ताप काढला! नको रे देवा. आतां अगदीं कानाला खडा—'

'समजलो' असं म्हणत तो हंसला. दोन वर्षांपूर्वी डॉक्टरही तिला अशाच हंसल्या होत्या. त्यांच्यावर तिला रागावता आलं नव्हतं. पण आतां लगेच तिच्या नाकाचा शेंडा तांबडालाल झाला आणि भुवया आकसल्या. तिच्या रागाची त्यानं परवा केली नाहीं. तिच्या ओलसर कानशीलावर त्यानं ओठ टेकले, आणि 'असं कधीं झालय!' असं म्हणत तो पुनः तसाच हंसला.

● ●

## नवीं प्रकाशनें

१ जीवन
वसंत सांगळे १॥ रु-

२ आडेगांवचे चौधरी
बी. रघुनाथ २॥ रु.

३ तेथें चल राणी
वसंत कानेटकर २॥ रु.

४ एव्हरेस्ट दर्शन
प्रभाकर पाटणकर २॥ रु.

५ अभागिनी
एमिल झोला १॥ रु.

६ बाळूची प्रिया
वि. वि. बोकील २॥ रु.

७ पदार्पण
सौ. सुशीला चिकटे २ रु.

८ नागकन्या
ग. त्र्यं. माडखोलकर ३ रु.

९ कदली
इंदिरा संत २ रु.

१० निवडक गुंड्याभाऊ
चिं. वि. जोशी १। रु.

**आमचीं प्रकाशनें** ( फक्त शिल्लक पुस्तकें )

| | | | |
|---|---|---|---|
| १. | माहेरघर | वि. वि. बोकील | १–८–० |
| २. | दिवाळसण | वि. वि. बोकील | २–०–० |
| ३. | बाळूची प्रिया | वि. वि. बोकील | २–८–० |
| ४. | हंसूं आणि आसूं | ना. सी. फडके | ५–०–० |
| ५. | उद्धार | ना. सी. फडके | ७–८–० |
| ६. | सुषमा | ना. सी. फडके | ५–०–० |
| ७. | रुमझुम | ना. सी. फडके | १–०–० |
| ८. | खेळणीं | ना. सी. फडके | ५–०–० |
| ९. | स्वराज्याचा अरुणोदय | प्र. के. अत्रे | ३–०–० |
| १०. | भूकंप | गं. भा. निरंतर | २–८–० |
| ११. | देणें देवाचें | मनमोहन | ३–०–० |
| १२. | माझीं भावगीतें | बाबूराव गोखले | २–०–० |
| १३. | पद्मा | गोपाल नीलकण्ठ दांडेकर | ३–०–० |
| १४. | माहेर | अरविंद गोखले | ३–०–० |
| १५. | घर | वसंत कानेटकर | ३–०–० |
| १६. | तेथें चल राणी | वसंत कानेटकर | २–८–० |
| १७. | मोरपिसें | अनंत काणेकर | २–४–० |
| १८. | आम्वराई | गिरीश | २–४–० |
| १९. | विखुरलेलें मोतीं | शान्ता माडखोलकर | २–०–० |
| २०. | लपलेला ओघ | ग. दि. माडगूळकर | २–४–० |
| २१. | छायाप्रकाश | सौ, आनंदीबाई लेले | २–०–० |
| २२. | फुलवाली | वि. वा. शिरवाडकर | २–०–० |
| २३. | पहिलें चुंबन | ग. ल. ठोकळ | ३–०–० |
| २४. | चुकामूक | दत्तू बांदेकर | १–८–० |
| २५. | जीवन | वसंत सांगळे | १–८–० |
| २६. | आडगांवचे चौधरी | बी. रघुनाथ | २–८–० |
| २७. | एव्हरेस्ट दर्शन | प्रभाकर पाटणकर | २–८–० |
| २८. | अभागिनी | एमिल झोला | १–८–० |
| २९. | पदार्पण | सौ. सुशीला चिकटे | २–०–० |
| ३०. | नागकन्या | ग. त्र्यं. माडखोलकर | ३–०–० |
| ३१. | निवडक गुंड्याभाऊ | चिं. वि. जोशी | १–४–० |